# पार्श्वसंगीत ×

आपल्या **हृदय-निनादाची** क्षणभर साथ करण्याकरिता श्री. नाडकर्णी यांनी मला निमंत्रण दिले. ते स्वीकारताना कोकणात मी त्यांच्या शेजारींच राहतो आणि निंदकाचे घर असावे शेजारी ही सतोक्ति यापैकीं कोणत्या गोष्टीचें त्यांना विस्मरण पडले याचा मला उलगडा झाला नाही. तसे पाहिलें तर हृदयाचे बोल हृदयानेच ऐकायचे असतात. अश्रूंतील कारुण्य कळायला एखाद्या मल्लिनाथाची मध्यस्थी कशाला हवी ? चुंबनातले प्रेम व्यक्त करण्याकरिता 'किसोमिटर' काढण्याची कल्पना अजून अमेरिकेतसुद्धा कोणाला सुचली नसेल. असे असूनही श्री. नाडकर्णी यांच्या या कथासंग्रहातील पुष्पांभोंवतीं प्रस्तावनेचा साधा दोरा कसाबसा गुंडाळायला मी तयार झालो याचे मुख्य कारण एकच आहे. तें म्हणजे हौशी लेखकाविषयी मला वाटणारें प्रेम !

धंदा व हौस या जोडप्यांचे छत्तीस गुण जुळणे जगात एकंदरींत कठीणच ! पुष्कळदा तर त्यांच्यामध्ये छत्तिसाचा आकडाच असलेला आढळून येतो. वाङ्मयाची आवड असलेल्या डॉक्टराकडे पहावे. मनुष्याच्या स्वभावाऐवजीं त्याच्या शरीरातच बिचाऱ्याला लक्ष घालून बसावे लागते. वाङ्मयातील विविध रस आणि दवाखान्यातील चित्रविचित्र औषधे या दोन चित्राकडे पाहून त्याचे मन किती वेळा हॅम्लेटचे काम करीत असेल ते त्याचे त्यालाच ठाऊक ! हौसेला मोल नसते ही म्हण आठवून आणि त्याच्या जोडीला धंद्याला मोल असते ही दुसरी बनवून मनाचें समाधान करून घेण्यापलीकडे त्याला दुसरें काय करता येणे शक्य आहे ?

आमच्या मध्याच्या समाजात हौसेला मोल असणार तरी कुठून ? धंद्याने पैसे मिळवून घरी आणावेत आणि हौसेने त्याच्या मनासारखा संसार सजवावा या पलिकडे उडी जावी कशी ?. या जोडप्यातही स्त्रीला आर्थिक स्वातंत्र्य आहे कुठे ? आणि म्हणूनच स्वातंत्र्याचे सुख नसतानासुद्धा जीं हौशी माणसें कोणत्याही कलेची उपासना करतात त्यांचे अधिक कौतुक वाटणें

× प्रस्तावना न आवडल्यास हें पार्श्वसंगीत हिंदी बोलपटांतील समजावें.

स्वाभाविक नाहीं का ? विनोदाचार्य कै० **तात्यासाहेब कोल्हटकर** 'तुजविण गमे वृथा संसार' हे मूकनायकांतील सुंदर पद हलक्या पण मधुर स्वरात म्हणूं लागले कीं त्या क्षणीं त्याच्या कल्पकतेपक्षाहि त्याच्या गायनाविषयीं आदर वाटू लागे. गणिताच्या प्रोफेसराचें कितन, फौजदारी वकिलाचे क्रिकेट, व्यापाऱ्याची चित्रकला, हे प्रयोग कानाला कसेसेच लागले तरी ते कुतूहलजनक नाहीत असे कोण म्हणेल ? विसंगत स्वभावाच्या पतीच्या सहवासात दिवस काढून आपले व्यक्तित्व प्रगट करणे हे काहीं सोपें काम नाहीं. हौसेंत पृथ्वीतलावरील गोष्टींपेक्षा अधिक दिव्य असे काहीतरी दिसते याचें कारण ही अवघड गोष्ट ती लीलेने करते हेच आहे. पाखरांचे भक्ष्य पृथ्वीवर असते. पण आकाशातील स्वैर विहारावाचून त्याना कधींतरी करमतें का ? मानवी मनाची हौसही अशीच असते. आनंद व जिज्ञासा याची ही एकुलती एक लाडकी लेक ! अनुरूप पति मिळो वा न मिळो, तिकडची मर्जी साभाळूनही आपल्याला हवे ते कसे मिळवावे याचे जणु उप-जतच ज्ञान असतें तिला. हौसेला मोल नसतें असे कुणी म्हटले म्हणून तिची किंमत थोडीच कमी होते ! एका इंग्रजी मुत्सद्यानें 'प्रत्येक मनुष्याचे मोल करता येते' असे उद्गार काढून मानवी जीवितातला पुरुषार्थ पौंड-शिलिंगाच्या कोष्टकात बसविण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच्या ध्यानींमनींहि नसेल की प्रीति, हौस, महत्वाकाक्षा इत्यादि अनेक अबला आपल्या या रेशमी जाळ्यात कधींच सापडणार नाहीत !

श्री. नाडकर्णी कोणत्या कचेरींत काम करतात हे मला नक्की ठाऊक नाही. परंतु तिथें लताकुंज नसून खुर्च्या टेबलेच आहेत, समोरच्या कागदपत्रात एकही कल्पित प्रेमपत्र असण्याचा संभव नाहीं आणि तेथील सर्वात मोठा रस शाई हाच होय हें सांगण्याकरिता त्याची जरूरी आहे थोडीच ! श्री. नाडकर्णी यानीं या संग्रहातील गोष्टी धंदेवाईक लेखकाप्रमाणे पानाकरिता लिहिल्या नाहींत अगर महत्वाकांक्षी माणसांप्रमाणे मानाकरिता रचिल्या नाहींत. पैसा व लोक-प्रियता यांच्यामागें लागल्यामुळे होणारी हास्यास्पद धांवपळ त्यात क्वचितच दिसेल. कॉलेजच्या चिमुकल्या इमारतींत बाधण्यात येणारीं भव्य प्रेम-मंदिरें अगर पहिल्या मजल्यावर राहणाऱ्या बिऱ्हाडांतल्या नातलगात वाहणाऱ्या अथांग प्रेमाचे भयंकर पूर त्याच्या गोष्टींत दृग्गोचर होत

नाहीत हे खरे. पण त्याला त्यांचा इलाज नाही. त्यांच्या निरीक्षणाचे क्षेत्र मध्यम वर्गापुरतेच मर्यादित झालेले आहे. त्यातील अविवाहित व नवविवाहित तरुण-तरुणींची चित्रे त्यांनी रेखाटली असली तरी त्यात प्रणयाचा लहरीपणा वा जहरीपणा कुठेच नाही. मुंबईसारख्या शहरात राहूनही संध्यारंगांप्रमाणे बदलणाऱ्या शहरातील स्त्रियांच्या विविध वेषभूषेचे प्रतिबिंब त्यांच्या संग्रहात कुठे पडले आहे? ' जगावे की मरावे ' या हॅम्लेटच्या सुप्रसिद्ध कोड्याप्रमाणे ' लग्न करावे की करू नये ' असे जे नवे कोडे मध्याच्या तरुण-तरुणींना भेवडावीत आहे त्याच्याकडेहि त्यांचे लक्ष जात नाही. या सर्वांचे कारण एकच आहे. त्यांचे लिहिणे म्हणजे बैठकीचे गाणे नव्हे. काम करताना श्रम हलके व्हावेत म्हणून मनुष्य ज्याप्रमाणे स्वतःशी गुणगुणतो, त्याप्रमाणे त्यांनी या कथा लिहिल्या आहेत.

'आदर्श नवमतवादी ' व ' दूषित दृष्टिकोन ', या गोष्टी वैचित्र्याच्या दृष्टीने या संग्रहात ठीक असल्या तरी होशी लेखकाने प्रमेयात्मक कथा लिहिणे म्हणजे गवयाने तंबोरा पेलता येतो म्हणून बंदुकीशी अतिप्रसंग करण्यासारखे आहे हेंच त्या सिद्ध करतात. उदाहरणार्थ पहिली उपहासगर्भ गोष्टच घ्या.

उपहास ही शस्त्रक्रिया आहे. पण शस्त्रक्रिया करण्यापूर्वी रोग्याला गुंगीचे औषध हुंगायला द्यावेच लागते. त्याप्रमाणे उपहासपर गोष्टीत विनोदाचे खेळकर वातावरण हवे. शिवाय नेमके कुठे शस्त्र चालवायचे हेही शस्त्रवैद्याला ठाऊक नको का? काळिज पूर्वी डावीकडे होते; पण हल्ली ते उजवीकडे रहायला आले आहे, असे सांगणाऱ्या मोलियरच्या वैद्याचा भाऊ शस्त्रक्रिया करू लागला तर त्याच्या हातातील शस्त्र उडून उरलेली गोष्ट पार पाडण्याचा प्रसंग मात्र त्याच्यावर यायचा! ' दूषित दृष्टिकोन ' मध्ये धनिकवर्गात मध्यम वर्गाचा समावेश करून त्याच्यावर कोरडे उडविणाऱ्या एका लेखकाला आपली चूक उमगून येते असे दाखविले आहे. मध्यम वर्गातली माणसे कुटुंबाचा चरितार्थ चालविता चालविता कर्जबाजारी होतात व त्यांच्या विक्रीला निघालेल्या जमिनी कुळवाडी घेतात हे दृश्य त्या लेखकाच्या डोळ्यात शेवटी अंजन घालते!

गारुड्याने झटपट उत्पन्न केलेले आंब्याचे झाड पाहून बाजारात हपूस आंबा महाग का विकला जावा असे विचारण्यासारखेंच हें प्रतिपादन वाटत नाहीं का? शेतकरी वर्गातील कितीशीं माणसे जमिनीचा तुकडा विकत घेण्याइतकी पुंजी

करूं शकतात ? बरें, एखाद्यानें टीचभर तुकडा विकत घेतला असे मानलें तरी लक्ष्मीची ही नखाएवढी मूर्ति संपादन करण्यासाठी त्या कुटुंबाला निढळाच्या घामाचा केवढा समुद्र निर्माण करावा लागला असेल ! श्रीमंताच्या मानाने मध्यम-वर्ग गरीब खरा ! पण काही झालें तरी फुलपाखरें होण्याची धडपड करणाऱ्या सुरवंटासारखीच त्याची मनःस्थिति असते. प्रत्यहीं पायदळीं तुडविल्या जाणाऱ्या मुंग्याच्या साखरेचा हेवा सुरवंटानी का करावा ? आमच्या पद्धतीने जर मध्यम वर्गातली कुटुंबे राहू लागली तर त्याना आपल्या जमिनी विकण्याचा प्रसंगच येणार नाही असा रोकडा सवाल एखाद्या कुळवाड्याने या गोष्टीतील लोकप्रिय लेखक श्रीकात याला केला तर त्याचे तो काय उत्तर देऊ शकेल ?

या दोन्ही गोष्टीत श्री. नाडकर्णी यानी सूचित केलेली समाजावरील टीका प्रामाणिकपणाची आहे यात संशय नाहीं. पण तत्त्वप्रतिपादनाच्या दीपस्तंभाला वैयक्तिक प्रामाणिकपणाचा वाळूंतील पाया काय उपयोगी ? तिथें शास्त्रशुद्ध खडकच हवा ! उष्णतामान ते मोजणाऱ्या यंत्रावरून ठरवायचे असते. विजेच्या विंझणाचे फिरते छत्र डोक्यावर धरून बर्फयुक्त पाणी पीत पीत एखाद्याने हवा थंड आहे असे म्हटले म्हणून उष्णतामापक यत्रातील पारा थोडाच खालीं उतरणार आहे ! श्री. नाडकर्णी भोवतालच्या वातावरणात उत्पन्न होणाऱ्या विविध लहरींना आपल्या कथामंदिरात प्रवेश करण्याला परवानगी देतात एवढे या गोष्टीवरून दिसून यायला हरकत नाही. परंतु त्याच्या लेखनाचा खरा विलास 'सौंदर्यदृष्टि,' 'झुलता जीव,' 'एकाद्याची मनोभूमिका', 'इंदू', 'मृत्युशय्येवरून', इत्यादि गोष्टींत दिसून येतो. 'सौंदर्यदृष्टि' या गोष्टीला जर भव्य पार्श्वभूमि असती तर ती आहे त्याहूनही अधिक परिणामकारक झाली असती. पण गबाळ बायकोला सुरेख करण्याच्या नवऱ्याच्या प्रयत्नाचे पर्यवसान तो तिला हेंगाडी दिसूं लागण्यात होतें हे पाहून कुणाला उपरोधगर्भ कारुण्याची जाणीव होणार नाहीं ? भस्मासुरानें स्वतःला वर देणाऱ्या शंकरावर उलटण्यातलाच प्रकार हा ! 'झुलता जीव' या गोष्टींत बायको कीं मूल या पेचात सांपडलेल्या मनुष्याचे करुणचित्र असून त्याची मांडणी लेखकांनीं मोठ्या कौशल्यानें केली आहे. 'इंदू'तील भावी पतीने आपल्या प्रियतमेकडे सावत्र आई म्हणून पाहण्याचा प्रसंग किती हृदयभेदक आहे, हें कल्पनेनेंच जाणणें बरें ! 'एखाद्याची मनो·

भूमिका ' व ' मृत्युशय्येवरून ' या गोष्टींत दिसून येणारी कल्पनारम्यताही आकर्षक आहे.

या सरस गोष्टीप्रमाणे ' त्याची निवड ' ' भोग ?—नव्हे त्यागच ! ' ' हृद-याचा लपंडाव ' ' त्रिवेणीसंगम ' इत्यादि गोष्टींतही कथेच्या रंजकतेला पोषक असे द्वंद्व श्री. नाडकर्णी यानीं चतुरतेने निवडलें आहे. सुंदर कथाचित्रात कल्पना, मांडणी व रंगसंगति याचा त्रिवेणीसंगम साधावा लागतो. या गोष्टी-तील मूळ कल्पना रसपरिपोषक असल्या तरी अनेक ठिकाणीं कल्पनारम्यतेचे गहिरे रंग वापरल्यामुळे त्याचा उठाव निर्दोष वाटत नाहीं. ' त्याची निवड ' या गोष्टीतील शरच्चंद्र, रावसाहेब कोठारे याची मुलगी कांता हिच्याशी लग्न करण्याचे मनात ठरवितो. पण योगायोगाने त्याचवेळीं ' वीणे ' ची केस त्याच्या हातात येते, व तिचे पर्यवसान वीणेचा हात त्याच्या हातात जाण्यात होते. कांता सोडून वीणेशी लग्न करण्याचे तो ठरवितो याचे कारण काय ? तर वीणेचा एक पाय तोडावा लागतो ! अशा रीतीने केवळ दुर्दैवामुळे एका पायावर लग्नाला तयार होणारी मुलगी पतकरणारे डॉक्टर समाजात आढळूं लागले तर विवाहित डॉक्टराच्या उत्पन्नाला धोका आल्यावाचून राहाणार नाही. कारुण्य ही भावना दयेला परिपोषक असली तरी वैवाहिक प्रेमाशीं तिचे जवळचे नाते खास नाही. स्वभावाच्या अगर अन्य दृष्टीने कांतेत काही वैगुण्य असतें तर ती गोष्ट निराळी. आंधळा त्याग काल्पनिक सृष्टीत कितीहि उदात्त दिसत असला तरी वास्तवाकडे वळलेल्या विसाव्या शतकात तो हास्यास्पद ठरणार नाही याची काळजी लेखकानी घेतलीच पाहिजे. गोष्टींतल्या वीणेचे नशीब चांगले म्हणून तिच्यापेक्षा ही अपंग अशा एखाद्या कुमारिकेची केस शरच्चंद्राला त्यावेळींच मिळाली नाही. नाहीतर वीणेला सोडून या नव्या ' केस 'शींही लग्न करायला तो तयार झाला असता !

' भोग ?—नव्हे त्यागच ! ' या गोष्टींतही वास्तवतेवर कल्पनारम्यतेचा पगडा बसलेला आढळून येतो. देशभक्त म्हणून तुरुंगात गेलेला रमेश बाहेर आल्या-वर विलासलोलुप होतो हा स्वभावातला फरक कुशल लेखकानें चित्रणविषय करण्याच्या योग्यतेचा आहे यांत संशय नाहीं. पण रमेशच्या मनोविश्लेषणाच्या भानगडींत फारसें न पडता श्री. नाडकर्णी यानीं त्याला स्पर्शजन्य रोगाच्या तावडींत देऊन ( समाज-स्वास्थ्यांतल्या शारदाबाई ही गोष्टच शक्यतेच्या

कोटींतील मानायला तयार होणार नाहींत. रमेशसारख्या लेखकाला ' गुप्तरोगांपासून बचावा'ची माहिती नसावी ! या दुर्दैवी देशांत सुधारणा केव्हां होणार? ) त्याला पापक्षालन करायला लावलें आहे. त्याच्या पत्नीचें नाव ' वसुंधरा ' आहे एवढें सांगितले म्हणजे त्याच्या या घाणेरड्या आजारातही तिनें त्याची अगदीं मनःपूर्वक शुश्रूषा केली असेल हें सांगायला नकोच !

कल्पनारम्यतेमुळेंच या संग्रहांत निर्माण झालेलें एक वैशिष्ट्य सहज वाचकांच्या लक्षांत येईल. तें म्हणजे बहुतेक गोष्टींत आढळून येणारी रहस्यें ! हार्डीसारखा उच्च दर्जाचा कादंबरीकारही उत्कंठा वाढविण्याच्या दृष्टीने रहस्यांचा उपयोग करून घेत असलेला दिसतो. वास्तवतावाद्याच्या मते रहस्यानीं कथानकें कृत्रिम होतात. बेपत्ता नातलग परत येणें, विविध बंधनानीं जखडलेल्या माणसांनीं एकमेकाला पत्ता लागूं न देता दिवस काढणें इत्यादि अद्भुत कोटींत पडणाऱ्या घटना त्यांना गारुड्याच्या खेळासारख्या वाटतात. स्वभावविकासाशीं विसंगत व रसहीन अशा रहस्याच्या बाबतींत त्याचें म्हणणें बरेंचसें लागूं पडतें. या संग्रहातील ' त्रिवेणीसंगम ' या गोष्टींत अशोकानें आपली पहिली बायको टाकलेली असून त्याचें डॉक्टरीण होणाऱ्या मंदाकिनीवर प्रेम बसलेलें असतें. योगायोगानें अशोकची बायको कुसुम इस्पितळात मंदाकिनीच्या विभागांत येते. या रहस्यांतली कल्पकता आकर्षक नाहीं असें कोण म्हणेल ?

श्री. नाडकर्णी लहान असताना श्री. वि. सी. गुर्जरासारख्या नामवंत लेखकाच्या गोष्टी अत्यंत लोकप्रिय होत्या. त्यांच्या रहस्याप्रियतेचा उगम कदाचित् बाळपणाच्या या वाचनात असेल. कथाविषय व स्वभावविकास याच्याशीं रहस्याची सांगड घालणाची अधिक दक्षता ते घेतील तर त्याच्या या आवडीचें सुंदर वाङ्मयगुणांत रूपातर होऊं शकेल.

**हृदय-निनाद** वाचणाऱ्या वाचकाला त्यातलें वातावरण अत्यंत सात्त्विक आहे असेंच आढळून येईल. सज्जनांचा स्वार्थत्याग व दुर्जनाचा पश्चात्ताप यांच्यावर नाडकर्ण्यांचा फार भर दिसतो. पण अथांग मानवी समाजाच्या चित्रणाला या गोष्टी शेवटीं पुऱ्या पडत नाहींत ! द्रोणाचार्यांचें हृदय योग्य वेळीं द्रवलें असतें तर अभिमन्यूचा बळी चक्रव्यूहांत पडलाच नसता ! मानवी मनोव्यापारांची अधिष्ठात्री देवता गणित शिकलेली नाहीं हेंच खरें !

श्री. नाडकर्णी यांची गणना साहित्यातील कलमी आंब्यात होवो वा न होवो! कित्येक रायवळ आंब प्रसंगीं कलमी आंब्याहूनही रसमधुर असतात असा अनुभव येतोच कीं नाहीं? "सौंदर्य-दृष्टि", "झुलता जीव" इत्यादि गोष्टींतल्या कथाप्रश्नांत आढळून येणारी कल्पकता श्रेष्ठ दर्जाच्या कथालेखकाला खचित उपेक्षणीय वाटणार नाहीं. "एखाद्याची मनोभूमिका", "मृत्युशय्येवरून" वगैरे कथांत कल्पनारम्यतेला नाजुकपणाची मुरड घालण्याची कला त्याना साध्य झालेली दिसते. "इंदू" मधील भाषेचा ओघ किती धांवता आहे! 'कोणाची तरी चाहूल लागल्याबरोबर पांखरे जशीं भुर्रकन् चार दिशेला उडून जातात, त्याप्रमाणे श्रीधरच्या खोलींत जमलेल्या बायकांची पांगापांग झाली' असली गोड वाक्यें लिहिणेंहि त्याच्या लेखणीला आवडतें. तंत्रदृष्ट्या त्यांच्या गोष्टी नव्याजुन्याच्या सीमेवर आहेत असें म्हणतां येईल. जुन्या गोष्टींतील पाल्हाळ व नव्या गोष्टींतील आडव्या उभ्या रेघाची खैरात टाळण्यांत त्यांनीं दाखविलेला संयम वाखाणण्याजोगा आहे. त्याच्या कथालेखनांतले विविध गुण अधिक स्पष्टपणे प्रगट होतील तर मराठी कथालेखकांत त्याना पुढील रांगांतील स्थान मिळविणे कांहीं अशक्य नाहीं. कॉलेजच्या क्रिकेटचमूंतून चौरंगी सामन्यातले कांहीं गडी उदयाला आले आहेतच कीं नाहीं?

पुणें
२६-८-३५

वि. स. खांडेकर



## पार्श्वसंगीताचा पडसाद

नामवंत आणि प्रथितयश लघुकथालेखकाचें सुरेल भावसंगीत ऐकण्यास सरावलेल्या शारदादेवीच्या कानांवर माझ्या हृदयाचे हे बदसूर निनाद पडताच ती क्रुद्ध तर नाहींना होणार अशी भीति हा संग्रह प्रसिद्ध करताना माझ्या मनाला चाटून गेल्याशिवाय राहिली नाहीं. पण दुसऱ्याच क्षणीं माझी ही भीति निराधार असल्याचें आढळून आलें. मातेच्या प्रेमळ अंतःकरणाला गवयाच्या गोड गाण्याइतकेंच बालकाचे बोबडे बोलही आकर्षक नाही का वाटत ? तशांत खांडेकरांसारखे शारदेच्या अत्यंत मर्जीतले तिचे एक निस्सीम भक्त माझ्या पाठीशीं उभे ! मग मी का घाबरावें ?

कारकुनी जगाचा ज्यानें थोडाफार अनुभव घेतला असेल त्याला तेथील एकंदर वातावरणांत हृदयाच्या कोमल भावना आणि उच्च मनोवृत्ति याचा आस्ते आस्ते कसा होम होत असतो, मन कसें मारले जात असतें, हे सांगावयास नकोच ! गाईला आत्मा नसतो या इंग्रजी म्हणीला जोडून उद्यां एखाद्यानें कारकुनास हृदय नसतें ही नवी म्हण तयार केली तर तर ती फारशी सत्याला सोडून होणार नाहीं. अशा वातावरणातही वरच्यासारख्या मनोवृत्ती सहीसलामत ठेवण्यासाठीं केलेली धडपड म्हणजेच हे निनाद !

निनादांतील गुणदोषांची छाननी रसिकवर्ग करीलच. फक्त गैरसमजाला जागा राहूं नये म्हणून एकाच गोष्टीचा येथें उल्लेख करणें जरूर वाटतें. ' आदर्श नवमतवादी ' या कथेंतील उपहासाचा रोख प्रामाणिक व कळकळीच्या नवमतवाद्यांवर नसून त्या मतांचा स्वतःच्या स्वार्थी वासनेच्या पूर्ततेसाठीं विपर्यास ( Distortation ) करणाऱ्या अर्धवट लोकावर आहे एवढेंच वाचकाच्या नजेरस आणावयाचें आहे.

शेवटीं, अंगांत ताप असतांही तरुण महाराष्ट्राचे आवडते लेखक श्री. भाऊसाहेब खांडेकर यांनीं माझ्या विनंतीला मान देऊन शेजारधर्मानें म्हणा, साहित्यावरील त्यांच्या अकृत्रिम प्रेमामुळें म्हणा, माझ्याबद्दलच्या आपुलकीमुळें म्हणा किंवा या सर्वांच्या संगमामुळें म्हणा, माझ्या " निनादाला " साथ करण्यांत जी तत्परता दाखविली त्याबद्दल त्यांचे कितीही आभार मानले तरी थोडेच होतील. त्याचप्रमाणें थॉमस आर्टच्या मालकांनीं मुखपृष्ठावरील फोटो छापण्यास परवानगी दिल्याबद्दल आणि नवजीवन मासिकाचे संपादक रा. मोरे यांनीं त्या फोटोचा ब्लॉक दिल्याबद्दल त्या दोघांचेही आभार मानणे जरूर आहे.

सर्वांचा नम्र.

**के. मु. नाडकर्णी.**

# सौंदर्य-दृष्टि ?

रविवारचा दिवस ! नित्यक्रमाप्रमाणे मी त्या दिवशीं भाईच्या घरीं गेलों. खाली मान घालून कसल्यातरी विचारात गढून गेल्यासारखा तो मला दिसला. माझ्या नेहमीच्या सवयीप्रमाणे मी पाठीमागून जाऊन दोन्ही हातानीं त्याचे डोळे झाकले.

मी दचकलो. त्याच्या नेत्रांतील अश्रूंनी माझी बोटे भिजून गेलीं. त्यानं मान वर करून माझ्याकडे पाहिले.

निराशा, खिन्नता, उद्विग्नता आणि विमनस्कता ही सारी एकसमयावच्छेदें-करून त्याच्या नेत्रात भरलेली मला दिसून आली.

मला हे सारे गहनगूढ वाटले. भाईच्या चेहऱ्यावरील सदाफुली आज त्याला सोडून गेली होती. कोट्या आणि विनोद याचा अविरत वर्षाव करणारे त्याचे ओठ घट्ट मिटले गेले होते.

इतका हताश झालेला आज त्याला मी प्रथमच पाहिला.

मला पाहताच त्यानं आपले डोळे धोतराच्या सोग्याने झटपट पुसून टाकले आणि वरकरणी हास्यमुद्रेने तो मला म्हणाला, " आलास, ये बैस ! "

मी बसण्याच्या स्थितीत नव्हतो.

" भाई, हे रे काय चालवलं आहेस तू आज ?—वहिनीची तब्यत तर बरीं आहे ना ? " मी त्याच्या खांद्यावर हलकेच हात ठेवून प्रश्न केला.

" सर्व काही ठाकठीक चालल आहे, मोहन ! " तो उत्तरला.

त्याच्या उत्तरात जिव्हाळा नव्हता. त्याच्या उत्तराशी वस्तुस्थितीचा मेळ बसत नव्हता.

" मग तुझ्या डोळ्यात अश्रू का ? "

क्षणभर तो काहींच बोलला नाही.

" मोहन, " थोड्या वेळाने तो म्हणाला " हे आता असच चालायचं ! हे अश्रू आतां माझे कायमचेच सोबती होऊन बसणार आहेत ! "

त्याच्या या आडून बोलण्यानें मी अधिकच गोंधळांत पडलों.

गेल्या रविवारींच मी त्याला भेटून गेलो होतो. गृहस्थ चागला हंसून खेळून वागला होता माझ्याशीं ! मग या आठ दिवसातच अशी काय गोष्ट घडून आली असावी, कीं भाईच्या तोंडून असे निराशापूर्ण उद्गार बाहेर पडावेत ?

" भाई, भाई, माझ्याशी तरी अशी प्रतारणा करूं नको रे ! खरंखुर काय झालं असेल तें मला सागून टाक कसा ! "

माझ्या ह्या उद्गारांतील कळवळा त्याच्या ध्यानात आल्यावाचून राहिला नाहीं; त्याचा चेहरा गोरामोरा झाला.

" मोहन, तूं माझा बाळपणापासूनचा हार्दिक मित्र ! तुझ्यापासून आजवर मी कोणतीच गोष्ट लपवून छपवून ठेवलेली नाही ! "—

" आणि मीपण तुझ्याशीं तशाच रितीने वागत आलो आहे ! "

" खरं आहे ! " तो म्हणाला. "–पण मी जे तुला आता काहीं सागेन तें पोरकट, क्षुल्लक किंवा एक " फॅड " म्हणून तूं माझी टर करशील अशी मला भीति वाटते. "

" वेडा आहेस का तूं भाई ? नेत्रावाटे अश्रू आणण्याइतकी ज्या गोष्टीची झळ तुझ्या हृदयाला लागली ती गोष्ट क्षुल्लक समजण्याइतके माझे अंतःकरण कांहीं कठोर नाही ! "

" मग सागतोंच आतां ! " असें म्हणत तो किंचित् पुढे सरकला. एकवार आजुबाजूला दृष्टि फेकली आणि म्हणाला, ' तुझी वहिनी—'

वहिनी ! एकूण ह्याच्या मानसिक दुःखाचे कारण म्हणजे त्याची—सहधर्मचारिणीच आहे तर ! हा विचार मनात येताच कसली तरी अप्रिय संवेदना माझ्या अंतःकरणाला चाटून गेली.

" तुझी वहिनी गरीब आहे, प्रेमळ आहे, गृहकृत्यांत दक्ष आहे. माझ्यावर तिचं भारीच प्रेम आहे "

आतां मात्र तशा स्थितींतही मला हंसू आल्यावाचून राहिलं नाहीं.

" भाई, वेड्या अशी गुणसंपन्न बायको मिळाली म्हणून का तूं दुःख करीत बसला आहेस ?—" मीं मधेच विचारलें.

" तसें नव्हेरे मोहन ! नीट ऐकून तरी घे !–मला वाटलंच होतं तूं असं कांहींतरी बोलून मला उडवून लावशील म्हणून ! "

" छे, छे ! असं कधीं झालंय् ! मला आपलं तुझ्या बोलण्याचं नवल वाटलं इतकंच ! साग बघूं पुढे—"

" तुझ्या वहिनींत इतके सगळे सगळे सद्गुण वास करीत आहेत. तसं पाहिलं तर कुरकुर करायला मला कांहींच जागा नव्हती. पण— "

" पण काय ? "

" पण सौंदर्यदृष्टि म्हणतात ती तिला मुळींच नाहीं ! माझा स्वभाव "—

" मला माहित आहे तुझा स्वभाव !" एका क्षणांत साऱ्या गोष्टी माझ्या ध्यानात येऊन मी म्हणालो. " भाई तूं फारच रसिक; तुझी कलादृष्टि वाखाणण्यासारखी ! तूं सौंदर्याचा खरा भोक्ता आहेस. तुझ्या ह्या सौंदर्यदृष्टीमुळें कित्येक वेळा तुझे मित्र तुला वेडयात काढीत असत हेंही मला माहित आहे. तूं खराच सौंदर्योपासक आहेस ! "

" मोहन, पण हीच सौंदर्यदृष्टि आज माझ्या दुःखाला कारणीभूत झालेली आहे. साधारण मनुष्याच्या नजरेला सहजासहजीं न दिसणारे दोष मला सौंदर्यदृष्टीमुळे ढोबळपणे दिसून येतात आणि त्यामुळे माझी ही सौंदर्यदृष्टि म्हणजे दोषदृष्टि तर नव्हे ना, अशीही शंका मधून मधून माझ्या मनांत उद्भवते. "

" भाई, हा तर्कवाद आता जरा बाजूला ठेव आणि मूळ मुद्यावर येऊन झटपट कायते सांगून टाक बघूं ! "

" तेच सागतो आता ! तुझ्या वहिनीला सौंदर्यदृष्टि नाहीं असे मी मघां म्हटलें त्याचा अर्थ तिला सुंदर वस्तु आवडत नाहींत असे नाहीं. पण स्वतः सुंदर कस दिसावं, आपल्या चालचालणुकींत, वागवागणुकींत सौंदर्य कसं प्रतीत करावं, ह्या कलादृष्टीचा तिच्यापाशीं पूर्ण अभाव आहे. मोहन, सुदैवानें माझी सांपत्तिक स्थिति चागली आहे. त्यामुळे नवीन फॅशनचीं लुगडीं, पातळें अगर ब्लाऊज मी तिला आणून देत असतो. पण हौशीने त्याचा उपभोग घ्यावा असं तिला कधीं चुकूनही वाटत नाहीं. तिच्या नेसण्यात गबाळेपणा भरलेला ! चापूनचोपून कसं नेसावं तें तिला माहित नाहीं आणि माहिती करून घेण्याची इच्छाही नाहीं. केशभूषेचीही तीच गत ! अनेक कामांपैकीं एक काम अशा दृष्टीनेंच ती केशभूषेकडे पाहत असते. त्यामुळें कसेतरी एकदांचे केंस एकत्र करून बांधून टाकले कीं झालं काम, अशी तिची दृष्टी असते. चांगल्या चांगल्या फुलाच्या वेण्या मी मुद्दाम विकत आणाव्यात आणि तिच्या " इतर कामां "–

पायीं त्या तशाच तासाचे तास पडून वाळून जाव्यात ! तशांतही शिरोधार्य करण्याचा मान एखाद्या वेणीच्या वाट्यास आलाच तर "काय हा जुल्म" असेंच जणूं ती वेणी म्हणत आहे अशाच पद्धतीने ती डोकीवर विराजमान झालेली आढळावयाची ! अशा एक ना दोन, अनेक गोष्टीकडे बारकाईने पाहून माझ्या सौंदर्यदृष्टीला क्षणोक्षणीं धक्का पोचतो आणि—

" पण भाई, हे सारं तूं तिला नीट समजावून का नाहीं सांगत ? मला खात्री आहे कीं आपल्या पतिराजाची आवड तिला कळून आली की ती तुझ्या मना-सारखी वागणूक खात्रीने ठेवील ! "

" वेडा आहेस तूं मोहन ! तुला असं का वाटतं की मी या गोष्टी तिच्या-जवळ बोललों नाहीं म्हणून ? प्रत्यक्ष नसल तरी पर्यायाने मी या गोष्टी तिच्या ध्यानांत येतील असा खूब प्रयत्न करून पाहिला. पण कोठल्याही गोष्टीची मनु-ष्याच्या मनात स्वाभाविक आवड असल्याशिवाय साऱ्या गोष्टी व्यर्थ आहेत !"

भाईचें म्हणणें मलाही पटले. तसे पाहिले तर वहिनीच्या स्वभावात नांव ठेवायला फारशी जागा नव्हती. आणि म्हणूनच भाई आपले सांसारिक जीवन सुखानें व्यतीत करीत असावा अशी माझी अटकळ होती. पण आंता त्याच्या-कडून कळलेल्या गोष्टीवरून त्याच्या कलापूर्ण नजरेने जेव्हा मी वहिनीकडे पाहूं लागलों त्यावेळीं त्याच्या म्हणण्यात बराच तथ्यांश असलेला मला आढळून आला. भाईनें दर्शविलेल्या गोष्टी प्रथमदर्शनीं क्षुल्लक वाटतात खऱ्या ! पण याच क्षुल्लक गोष्टींची कीड लागून अनेक दंपत्याच्या संसारसुखाची होळी झालेली उदाहरणें मी पाहिलेली आहेत. इतकेंच नव्हे तर घरी सुंदर आणि सुशील पत्नी असूनही केवळ वर दर्शविलेल्या दोषामुळे कित्येक पतिराजानीं आपल्या सौंदर्योपासनेची आणि कलादृष्टीची तहान भागविण्यासाठींच बाहेरख्यालीपणा केल्याचींही उदाहरणे माझ्यापाशीं होतीं. आणि म्हणूनच भाईच्या प्रस्तुतच्या मनःस्थितीवर काय उपाययोजना करावी याचा मी विचार करू लागलो.



आमच्या कामात कल्पनेच्या पलीकडे आम्हाला यश येऊं लागल्याचे लवक-रच दिसून येऊं लागलें. विशेषतः या कामीं माझ्या ताईने पुढाकार घेतल्यामुळेंच आम्हीं यशस्वी झालों होतों. तिच्या व इतर मैत्रिणीच्या सहवासानें, अनुकर-णानें, चार चौघात बसल्या उठल्यानें, चार ठिकाणीं हिंडल्या फिरल्यानें आणि

वाचन शिक्षणादिकाच्या साह्याने आमच्या वहिनीची दृष्टी अलिकडे बरीच कला-पूर्ण झाली होती. पूर्वीच्या तिच्या गबाळेपणाला केव्हाच मूठमाती मिळाली होती. तिच्या प्रत्येक हालचालीत आता कलाकृति दिसून येऊं लागली होती. तिच्या वेषभूषेतच नव्हे तर चालण्यात सुद्धा एक प्रकारचें सौंदर्य प्रतीत होऊं लागलें. आपल्या सौंदर्याची वाढ कशानें होईल, तें अधिक खुलून कसें दिसेल, थोडक्यात म्हणजे आपण आहों त्याच्याहून अधिक सुंदर कसें दिसूं याचा विचार करण्या-तच तिचा बराच वेळ जाऊं लागला. आणि त्याला पोषक असलेलीं साधनें आणून देण्याचा भाईचा एक धंदाच होऊन बसला. भाईलाहि असे करण्यात आनंद वाटूं लागला. तो तिची प्रत्येक इच्छा पूर्ण करूं लागला. परिस्थितीत असा अनुकूल फरक घडून आणल्याबद्दल त्यानें मला आणि माझ्या ताईला अनेक धन्यवाद दिले. आणि मित्रकार्याचें पुण्य माझ्या हातून घडल्यामुळें मलाहि समाधान वाटलें.

त्यानंतर कित्येक दिवसानीं—

मी माझ्या खोलींत दुपारच्या वेळी कायसेसे वाचीत पडलो होतों. पुस्तक मनोरंजक आणि बरेंच आकर्षक होतें यांत शंका नाहीं. कारण वाचण्याच्या नादात भाई केव्हा येऊन माझ्या शेजारीं बसला तें मला कळलें देखील नाहीं.

त्याच्याकडे माझी नजर जाताच मी चरकलों.

तोच तो मागचा उदास आणि खिन्न चेहरा !

आज इतक्या दिवसानीं चंद्राला पुन्हा ग्रहण लागलेलें पाहून मला विस्मय वाटला. वास्तविक आता सर्व कांहीं त्याच्या मनासारखें होत होतें. नाव ठेवा-यला त्याला कुठेंच जागा नव्हती. त्याच्या सौंदर्यदृष्टीची तहानही आता पूर्णपणें भागत असल्याचें त्यानें मला अनेकवार बोलून दाखविलें होतें. मग आज हे असें का ?

मी त्याला प्रश्न केला, आणि निष्पाप अंतःकरणानें त्यानें मला सांगितलें.

" मोहन, डाव उलटला. तो इतका कीं, तो माझ्या अंगाशी येऊन मी त्यांत हरलोंच ! नवरा बायकोंतील बारीक सारीक गोष्टी दुसऱ्याला सांगणें हा शिष्टाचार नव्हे हे मी जाणतों. पण एक तर तुला साऱ्या गोष्टी ठाऊकच आहेत, आणि दुसरें म्हणजे मी जे आता कांहीं सांगणार तो म्हणजे मागील गोष्टीचा उत्तरार्धच आहे ! " इतकें बोलून त्यानें किंचित खाकरल्यासारखें केलें

आणि म्हणाला, " मोहन, तुला माहितच आहे कीं तुझ्या वहिनीला सौंदर्य-दृष्टि प्राप्त झाल्यानंतर आमच्या घरांतील वातावरण पार बदलून गेलें. पूर्वीच्या अनेक गोष्टी आतां तिला निरस आणि निरर्थक वाटूं लागल्या. घरांतील सर्व वस्तू आतां अत्यत टापटीपीनें आणि व्यवस्थेने ठेवण्यात येऊन त्याची कलापूर्ण रचना करण्यात येऊं लागली. कुरूपपणाचा आणि अव्यवस्थेचा तिला आता मनापासून तिटकारा वाटूं लागला. तिच्या स्वतःच्या वर्तनातही कसे परिवर्तन घडून आलें तें तुला माहित आहेच! तिची सौंदर्याची प्रत्येक आवड पूर्ण करण्यात मलाही सुख वाटे. एके दिवशीं लडिवाळपणाने आणि बायकांमध्ये जात्याच असलेल्या गोड भाषेने तिने माझ्या पोषाखावर पर्यायाने बरीच टिका केली. तिच्या बोलण्यावरून माझे जाडेभरडे कपडे तिला आवडत नसावेत असें दिसले. " सूट बूटा "त अप–टू–डेट पोषाख केलेल्या माझ्या कांहीं मित्रांचे फोटो खोलींत टांगलेले आहेत त्याच्याकडे अंगुलिनिर्देश करून ती म्हणाली, ' हा " ड्रेस " किती छान दिसतो नाहीं ? ' कसल्या कोण जाणे पण एका चमत्कारिक भावनेने माझें अंतःकरण किंचित थरारले. पण ते क्षण-भरच! दुसऱ्या क्षणींच मला वाटलें, कीं खरेच, तिच्या या सौंदर्यदृष्टींत काय वावगें आहे ? आपल्या पतीनें डौलदार पोषाख करावा ही तिची इच्छा स्वाभाविकच नव्हे का ? मग मी तिच्याच पसंतीने कापड घेऊन सूट शिवून घेतले, आणि तिची आवड पूर्ण केली. पण काय असेल ते असो, आता माझ्या वागणुकींतील पूर्वीचा नैसर्गिकपणा जाऊन त्याची जागा कृत्रिमपणाने घेतली. माझ्या प्रत्येक हालचालींत व वागणुकीत ' तिला माझी ही कृति पसंत पडेल का—' हा विचार सारखा डोकावूं लागला. असेच आणखीही कांहीं दिवस निघून गेले. अलीकडे तिच्या मुद्रेवर पूर्वीचा खेळकर आनंद दिसेनासा होऊं लागला. कसलें तरी शल्य तिच्या मनात खुपसत असावें असे मला दिसून येऊं लागलें. तें काय असावें याचा तर्क मला होईना!

पण—

त्या दिवशीं मी बाहेरून लौकरच आलों. ही माझी नेहमीची येण्याची वेळ नसल्यामुळें मी आल्याची तिला चाहूलही लागली नाहीं. तिची खोली माझ्या खोलीलाच लागून होती. आपल्या जीवाभावाच्या एका मैत्रिणीबरोबर तिच्या हळुहळु गोष्टी चाललेल्या मी ऐकल्या. वास्तविक मी तिकडे लक्षच देणार नव्हतों

पण मधेंच कुणीतरी हुदका दिल्याचें माझ्या कानी आलें. मग मात्र काय प्रकार आहे तो समजावा म्हणून मी दाराला कान लावून त्याचें बोलणे ऐकूं लागलों.

" मालू " तिची मैत्रीण म्हणत होती, " असं काय वेडयासारखं करावं ते ! वेडे, बाकी सगळ्या गोष्टीना सौंदर्याचा उजाळा देता येईल ! पण शारीरिक कुरुपतेपुढे कुणाचा तरी इलाज चालेल का ? दैवात असलेल्या गोष्टी गोड मानून घेऊन चालणे हाच श्रेयस्कर मार्ग नव्हे का ?"

" ते सार मला कळत ग कुसुम, " ती म्हणत होती, " पण कळूनही वळत नाही त्याला मी काय करू ? त्याचा काळसर वर्ण, चपटे नाक, आणि बसके गाल ह्याच्याकडे नजर गेली की माझ्या सौंदर्यदृष्टीला सारखे धक्के बसतात आणि—"

"मोहन, मोहन, याला काही उपाय आहे का रे ! "

मी खिडकीतून वर आकाशाकडे पाहून म्हटले, ' देवाधिदेवा, तूच सांग, याला काही उपाय आहे का रे ? '



## झुलता जीव !

" पाहिलंत् सरलाताई !—काय असेल ते असो बाई, पण तुम्ही त्याला उचलून घेतलंत कीं हा अस्सा करतो. "

" किनई, इंदिराबाई, माझ्या अंगाला काटे लागले आहेत हो ! ते बाळाला बोचतात ! " किंचित् उपरोधिकपणाने सरलाताईने उत्तर दिले.

". राग नका येऊं देऊ सरलाताई, पण मी आपल–घ्या; लागला रडायला ! काय झालं रे गुलामा असं एकाएकीं किंचाळायला ? घ्या त्याला इकडे सरलाताई !–बघा, लागला लबाड हंसायला ! " विजयी मुद्रेने इंदिराबाई म्हणाली.

सरलाबाईची मुद्रा हिरमुसल्यासारखी झाली. तिला इंदिराबाईचा किंचित् रागही आला. जाण्याच्या तयारीने तिनें आपल्यापुढील शिवणकामाचा पसारा आटोपण्यास सुरवात केली.

तांदूळ निवडीत बसलेल्या सुमनच्या हें लक्षात आले. आपल्या बाळाला घेण्यासाठीं या दोघींत चालणारी अहमहमिका पाहून तिला अभिमानच वाटला. पण त्यापायीं त्यातल्या त्यात एकीला वाईट वाटलेले तिला आवडले नाही.

" हें काय, चाललात कुठं सरलाताई इतक्यात ? बसा कीं थोडा वेळ ! "

शामच्या आईनेंच असें म्हटल्यावर तिचा नाइलाजच झाला.

आपलें सहजचे बोलणें सरलाताईनीं मनाला लावून घेतलेले पाहून इंदिराबाईचा जीवही आतां चुटपुटूं लागला. विषयांतर करण्यासाठीं त्या म्हणाल्या, " सरलाताई, अगदी खरं खरं सांगा हं आतां ! या शामचा तोंडवळा कुणासारखा दिसतो हो ? "

" अगदीं आपल्या वडिलांसारखा ! हे काय सांगायला का हवं ? "

" घ्या, झालं आता ! श्यामच्या आईला मीं सांगितलं तर त्यांना वाटलं–"

" मला नाहीं हो कांहीं वाटलं ! तुम्हींच आपलं काय तें बोला ! मी आपली कान उघडे ठेवून ऐकत्यें म्हणजे झालं ! " सुमन मध्येंच म्हणाली.

" आतां तुम्हींच पाहा, शामच्या आई, हे त्याचे गरगरीत डोळे—"

" हें नाक—"

" ही कपाळाची रुंद पट्टी—"

" ही ओठाची कमान—"

" सारं अगदीं हुबेहुब—"

स्लीपरचा आवाज खोलीच्या दारापर्यंत येऊन थांबल्यामुळे तिघींनीही वर पाहिले. शामचे वडील, श्रीधर !

कोणाची तरी चाहूल लागल्याबरोबर पाखरें जशी भुर्रकन् चार दिशेला उडून जातात त्याप्रमाणे श्रीधरच्या खोलीत जमलेल्या बायकांची पांगापांग झाली.

श्रीधरने कपडे काढून ठेवले आणि मोरींत जाऊन हातपाय धुवून तो बाहेर आला. एवढया अवधीत सुमनने शामचे कपडे बदलून त्याला घेऊन ती श्रीधर बसला होता तिकडे आली.

" कसा पण खुदकन् हंसला पाहिल्याबरोबर ! जसं काय ओळखलंच कोण आहे ते ! " सुमन कौतुकाने म्हणाली.

" मग ओळखलच म्हणावं ! आता काय आम्ही लहान का आहोंत न ओळखायला ? " शामला तिच्याजवळून घेत श्रीधर म्हणाला. " पण राजश्री, आम्हाला गंगास्नान मात्र घालूं नका हां ! तेवढी बरिक मेहरबानी करा ! नाहीं तर याल लाडात आणि—"

" तर ! अगदी अनर्थच गुदरेल की नाही ? काय बाई तरी ! "

सुमनने हळूहळू शामच्या बाललीलांचे वर्णन करण्यास सुरवात केली. तो कितीदा रडला, कितीदा हंसला, त्याला कुणी कुणी घेतलें, इत्यादि इत्यादि.

" त्या इंदिराताई म्हणत होत्या—"

" काय बरं म्हणत होत्या त्या इंदिराताई ? " तिच्याचसारखा स्वर काढून श्रीधर चेष्टेने म्हणाला.

" मी नाहीं जा ! अशानं मी सांगत नाहीं ! " लटक्या रागानें सुमन म्हणाली.

" तूं नाहीं सांगितलंस तर हा शाम सांगेल मला ! शाम, बाळ, काय बरं म्हणत होत्या त्या इंदिराताई ? "

" सांग ! म्हणावं त्या म्हणत होत्या की, तुमच्या शामचा चेहरा अगदीं हुबेहुब इकडच्यासारखा आहे म्हणून ! "

" वा, म्हणजे तुझी एक मोठीच सोय झाली म्हणायची ! म्हणजे असं,– समज, उद्यां तूं माहेरीं गेलीस आणि तिकडे गेल्यावर चुकून केव्हां तरी तुला माझी आठवण झाली—"

" चुकून ? शोभतं ना बोलायला असं ? "

" बरं बुवा, चुकून नाहीं; अगदीं चुकल्याशिवाय रोज चोवीस तास माझी सारखी आठवण येत राहिली—"

" नीट म्हणून बोलायला शिकवलं नाहीं वाटतं कुणी ? "

" नाहीं ग ! कोण शिकवणार ? आता तुझी संगत लाभल्यापासून कुठं चार दोन बोबडे शब्द बोलायला येताहेत !

" मी आतां बोलतच नाहीं मुळीं ! "

" नको बोलूंस ! पण ऐकायचं तरी काम करशील ना ?–तेव्हा काय म्हणत होतों मी ?—हो, माहेरीं गेल्यावर तुला ज्या वेळीं माझी आठवण होईल त्या वेळीं या शामकडे—पतीच्या या बालस्वरूपाकडे पाहून तुला आपली दुधाची तहान ताकावर—"

" जा गडे !–मी जातेच कशी घरांत निघून ! "

" खरंच ! रागानं का होईना, पण एकदा का तूं घरात गेलीस आणि तो घरांतील स्टोव्ह तुझ्या दृष्टीला पडला म्हणजे बाहेर एक जीव चहासाठीं तळमळतो आहे याची तुला आठवण होईल ! "

" खरंच गडे ! कशी अगदींच विसरून गेले मी चहाला ठेवायचं ! "

तें सहा महिन्याचें बालक सुमनला जीव कीं प्राण वाटत असे. सुमारें तीन वर्षांपूर्वी तिचा एक मुलगा दीड वर्षाचा होऊन वारला होता; त्यामुळें तर शामला ती फारच जपत असे. त्याच्या प्रकृतीला जरा कुठें खुट् झाले, कीं तिचा जीव अगदीं घाबरून जाई. दिवसातून किती वेळा तरी ती बाळाची मीठ–मोहरीनें दृष्ट काढी. शामकडे तिचें इतकें लक्ष लागून राहिल्यामुळें पतीविषयक कर्तव्यांत तिच्याकडून बरेचदा हेळसाड होई. पण श्रीधरला तिची मनःस्थिति पूर्णपणें माहित असल्यामुळे तो तिकडे कानाडोळाच करी.

रात्रीचे बारा वाजून गेले होते. जिकडे तिकडे सामसूम झालें होतें. शाम पाळण्यांत झोंपीं गेला होता. आणि शामची आईही निद्रासुखाचा अनुभव घेत होती. श्रीधर मात्र अजून जागाच होता. त्याला कांहीं केल्या झोंपच येत नव्हती.

तो या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत होता. हा कांहीं त्याचा आजच्या एका दिवसाचाच अनुभव नव्हता. अलीकडे बरेच दिवस त्याला अशाच तळमळींत घालवावे लागत होते. बाहेरून आनंदी दिसणाऱ्या त्याच्या चेहेऱ्याकडे कोणी बारकाईनें पाहिले असते तर त्यावर दिसून येणारी अनुतापाची छटा कोणालाही सहज दिसून आली असती. कसल्या तरी दुःखाची जाणीव त्याचे अंतःकरण जाळीत होती; आणि त्यामुळेच सुखाच्या झोंपेला तो आज कैक दिवस आंचवला होता.

थोडया वेळानें तो उठून बिछान्यावर बसला. त्याची नजर पाळण्याकडे गेली. निद्रिस्त शामच्या गोजिरवाण्या मूर्तीकडे तो किती वेळ तरी सारखा टक लावून पाहत होता. पाहता पाहता त्याचे डोळे भरून आले.

" शाम, शाम, बाळ ! तुझा भाऊ--" असें कांहींसे अर्धवट पुटपुटत त्यानें आपले तोंड दोन्ही हातानी झाकून घेतलें.

त्याची नजर बाजूला झोपलेल्या सुमनकडे गेली. साऱ्या दिवसाच्या कामानें श्रमून गेलेला तो जीव गाढ झोपेंत होता.

" सुमन, माझी सुमन मला काय म्हणेल ?—फुलाहूनही नाजूक असलेल्या तिच्या हृदयाला धक्का नाहीं का पोंचणार ? तिला काय वाटेल ? मी किती दुष्ट, चांडाळ ! ती मला क्षमा करील का ? पण–पण माझ्या हातून खरोखरच अन्याय घडला का ? मी खराच अपराधी आहे का ? कोण मला हें सांगेल ? माझा त्यात स्वार्थ होता का ? सुमन, केवळ तुझ्याचसाठीं मला तसं करणं भाग पडलं. तुझा जीव जगविण्यासाठीं—"

कशी कोण जाणे ! पण सुमन एकाएकीं दचकून जागी झाली. ती धांवतच पाळण्याकडे गेली. शामला स्वस्थपणें झोंपलेला पाहून तिच्या जिवांत जीव आला.

" हें काय ? आज झोपायचं नाहीं का ? अन् हें आपल्या डोळ्यांत पाणी का ? "

" उगीच !--पण सुमन, झोपेंतून अशी एकाएकीं दचकून कां उठलीस ? भ्यालीस का ? "

" हो ! कशी नाहीं भिणार ? एकेक स्वप्न तरी काय विचित्र पडतं बाई ? "

" काय स्वप्न पडलं तुला, सुमन--? "

" छे, कांहीं नाहीं ! "

" सुमन ! मला सांगण्यासारखं नाहीं का तुझं स्वप्न ? "

" सांगायलाच हवं का ? "

" तुझी मर्जी ! "

" असं काय बोलायचं ते ! पण मग लावून नाही ना घ्यायचं मनाला ते ?"

" वेडीच आहेस तूं सुमन ! स्वप्नातल्या गोष्टी का कुणी मनाला लावून घेत असतं ? "

" पण मला बाई फार भीति वाटली. मी नको नको म्हणत असताना माझ्या शामला आपण माझ्याकडून हिसकावून घेतलत आणि दूर दूर नेऊन एका निर्जन भयाण अरण्यात त्याला एकटाच टाकून आपण परत आला ! आणि " माझा बाळ कुठं ? " म्हणून मी विचारताच " देवाघरी ! " असं आपण म्हणालात. मी मोठ्यानें ओरडले आणि जागी झाले. "

" किती वेडगळ स्वप्न ! सुमन, मी असं कधी तरी करीन का ? "

" मी असं कधीं तरी म्हटलं का ?—पण आधी मला सांगाव आपल्या डोळ्यांत पाणी कां ? "

तो काहींच बोलला नाही. बोलाव की बोलूं नये याचाच तो विचार करीत होता.

" मला नाहीं का सांगायचं ? काय होतं आपल्याला ? बरं वाटत नाही का ? "

" सुमन, खरं सांगूं का ? मला तुझी भीति वाटते ! "

" माझी भीति ? "

" होय, सुमन ! तुझ्यापासून एक गोष्ट मी आज बरेंच दिवस चोरून ठेवली होती; आणि त्याच्या जाणीवेपासून होणारं दुःख मी एक रात्र सहन करीत होतों. पण शामच्या जन्मापासून तर ती गोष्ट जित्ताला अधिकच जाळूं लागली आहे. सुमन ! माझ्यानं आता अधिक धीर धरवत नाही. आज तुला मी सर्व काहीं सांगून टाकणार आहें. मग तू मला वाटेल ते म्हण ! "

" सुमन ! " तो सांगूं लागला, " तुला आपल्या मोहनची आठवण आहे का ? "

" हें काय बरं विचारणं ? आपल्या पोटच्या गोळ्याचा कुठच्या तरी आईला कधीं विसर पडेल का ? आज तो असता तर चांगला चार पाच वर्षांचा झाला असता !—"

" पण तो दीड एक वर्षांचा असताना तूं अतिशय आजारी पडलीस ! "

" हो ! तो माझा पुनर्जन्मच झाला म्हणायचा ! मी त्या दुखण्यांतून वाचायाला कारण केवळ आपली—"

" तुझी आशा त्यावेळीं सगळ्यानींच सोडली होती. होते नव्हते तेवढे सारे उपाय करून मी थकलों होतों. नांवाजलेल्या बहुतेक डॉक्टरानीं हात टेंकले होते. तू जाणार ही कल्पना मला अगदींच असह्य होत होती. काय वाटेल ते करावयाला मी तयार झालो. त्यादिवशी डॉक्टरनं मला एकीकडे नेऊन सागितलं कीं, तूं आता फारच थोड्या दिवसाची सोबतीण आहेस ! निराशेच्या भयंकर दरीत कोणीतरी लोटून दिल्याचा मला भास झाला. "

" डॉक्टर, आता याला काहीच उपाय नाही ना ? " मी अगदीं केंविल-वाण्या स्वरान विचारलं.

" उपाय ? आता कसला उपाय ?–पण आहे एक शेवटचा उपाय ! तुमची तयारी असेल तर पाहा बुवा ! "

" माझी—माझी वाटेल ते दिव्य करायला तयारी आहे. " मी उत्सुकतेनें म्हणालों, " काय करू तेवढे सागा ! "

" उपाय असा की, या तुमच्या लहानग्या मुलाचं रक्त काढून तिच्या अंगात घालावं लागेल ! मग मात्र ती बरी होईल यात शंका नाहीं ! "

" मुलाचं —माझ्या लाडक्या मोहनचं ? या गोष्टीला मी कशी संमति देऊं ? डॉक्टर माझं रक्त नाही का चालण्यासारखं ? " मी अगदी निर्वाणीनें विचारलं."

" छट् ! दुसऱ्या कुणाचंच रक्त कामाला येणार नाही ! पाहा बुवा ! आजची रात्र काय तो विचार करा आणि मला उद्यां काय तें कळवा ! एक गोष्ट मात्र विसरूं नका, कीं मुलाचं रक्त काढायचंच ठरल्यास मुलगा फार दिवस वांचेल असं काहीं मला सांगतां येणार नाहीं. "

ती रात्र मीं कशी घालविली असेल तें एक परमेश्वराला माहित ! माझ्या मनाचा कांहीं केल्या निश्चय होत नव्हता. ' सुमन कीं मोहन ' हा क्रूर प्रश्न मला भेडसावून सोडीत होता. माझी प्रीतिदेवता मला सोडून जात होती. माझं सारं जीवित अंधकारमय होणार होतं. या गोष्टीला माझी तयारी नव्हती. कांहीं झालं तरी सुमनला वांचवलीच पाहिजे असा मी निश्चय केला. पण मोहनच्या जीवितावर

पाणी सोडावं लागेल त्याची काय वाट ? काय करूं ? हा जीव कीं तो जीव ? पत्नी कीं पुत्र ? कुणासाठी कुणाचा बळी देऊं ? सारी रात्र विचारांत घालविली आणि शेवटीं निर्धार केला की, सुमनला वाचवावी !

" दुसऱ्या दिवशीं डॉक्टरला मी माझा निर्धार कळविला. डॉक्टरनं आपली कामगिरी पार पाडली. सुमन, तूं वाचलीस पण तुझा मोहन नंतर एका महिन्याच्या आंतच तुला नि मला सोडून गेला. ही गोष्ट हळूहळू मी विसरून जाण्याचा प्रयत्न करीत होतों. पण अलीकडे शामला पाहिलं की, मला मोहनची आठवण होते आणि हृदय अगदी कालवून निघतं. सुमन, किती दुष्ट आहे मी?"

सुमनच्या डोळ्यांतून सारखे अश्रू ओघळत होते. ती मनसोक्त रडून घेत होती.

" काय बरं केलंत हें ! मी मेले असते तर काय दुनिया ओस पडली असती ? पण मी आपल्याला तरी काय म्हणून दोष देऊं ? आपल्यापुढे परिस्थितिच तशी होती ?"

" सुमन, घटकाभर अस समज कीं, तुझ्याऐवजीं मीच अगदीं मरणाच्या पंथास लागलों असतो आणि मृत्यूच्या दाढेतून मला ओढून काढण्याचा तोच एक मार्ग तुला डॉक्टरानीं सांगितला असता तर—तर सुमन तू काय केलं असतस?"

" मी–मी खरंच, कशी बरं वागलें असतें मी ? कुणी सांगावं ? " तिनें हलकेच आपली मान त्याच्या खांद्यावर टाकली.

खरेंच कुणी सांगावें ?—कुणी सांगावें ?



# एकाग्याची मनोभूमिका



" हृदयाचें पावित्र्य—अंतःकरणाची एकनिष्ठता—इतक्या उत्कटतेनें व्यवहारात प्रत्यक्ष अनुभवास येणें शक्य तरी आहे काय ? " नुकत्याच वाचून संपविलेल्या गोष्टीचे हस्तलिखित टेबलावर आपटीत जलबालेनें वरील उद्गार काढले. टेबलावर इतस्ततः पसरलेल्या हस्तलिखिताच्या बाडांकडे निमिषभर नजर फेंकून तिनें पुन्हा एकदां उपरोक्त चोपडे हातात घेतले व त्याचीं पाने वरवर चाळण्यास सुरवात केली.

खास स्त्रियासाठी काढलेल्या ' उन्नति ' मासिकाची संपादकीय जबाबदारी संभाळण्याचें काम हल्लीं जलबालेकडे आलें होतें. आणि या अल्पावधींत बऱ्याचशा लघुकथा तिने हाताळल्या होत्या. पण आताच वाचनांत आलेल्या लघुकथेइतकी सरस लघुकथा तिला आढळली नव्हती. तिला ती फारच आवडलेली दिसली. आपली एखादी प्रिय वस्तु हरवलेली असावी, तिचा आपण कसून शोध करावा, अखेरीस ती सापडण्याचा संभव न दिसल्यामुळे हताश व्हावें, आणि एक दिवस अचानक दृष्टीस पडावी म्हणजे जो आपल्याला आनंद होतो तशाच प्रकारच्या आनंदाची आता तिला अनुभूति झाली. एका तरुणाच्या प्रेमाची एकनिष्ठता पराकोटीस गेलेली अतिशय सुंदरतेनें त्या कथेत दाखविण्यात आलेली होती. आणि ती स्वतः अशाच तऱ्हेच्या हृदयाची भुकेली असल्यामुळें ती गोष्ट वाचून तिची वृत्ति आनंदित झाली होती. पण हा तिचा आनंद वळवाच्या पावसाप्रमाणें अगदीं क्षणभरच्च टिकला. त्या गोष्टींतील नायकाचे स्वभावचित्र म्हणजे तो केवळ लेखकाच्या कल्पनेचा उल्लास होता ! सत्यसृष्टींत तसें चित्र आढळणें फारच दुरापास्त ! हा विचार मनात येतांच ती किंचित हिरमुसल्यासारखी झाली.

हजारांतून एखादीच्याच वाट्यास येणारें लावण्य तिला लाभलें होतें. त्यामुळें बरेचसे लाळघोटे तरुण सदा तिच्या आवतीभोंवतीं असावयाचे हें आपलें ठरलेलेंच. त्यांच्या अप्रयोजक लाघवी भाषणांचा आणि स्तुतिपुष्पांच्या वर्षावाचा तिला मनापासून तिटकारा वाटत असे; पण विवक्षित कार्यक्षेत्रामुळें अशा तरुण

व पदवीधर लेखकांशीं तिचा वारंवार संबंध येणें अगदीं अपरिहार्यच होतें. पण या एवढ्याच सुताने बऱ्याचशा तरुणानी तिच्या प्रेमाचा स्वर्ग गांठण्याचा जणूं काय चंगच बाधला होता. इतकेंच नव्हे तर एकादोघानीं आपल्या प्रीतीचा पाढा तिच्यापुढें वाचूनही टाकला होता.

तिला हंसूं लोटलें. " प्रेम ! या सवंगसुकळ प्रेमाच्या लाटा समाजास रसातळास न नेवोत म्हणजे मिळविली ! " तिने मनात म्हटले.

" माझ्यावर तुमचं उत्कट प्रेम आहे हे तुम्हीं कशाच्या आधारावर म्हणता ?" असा एकदां तिने एका तरुणास प्रश्न केला होता.

" काय सांगूं ! " त्याची काव्यवाणी बोलली. " माझ्या हृदयकपाटाची दारें खोलून पाहशील तर त्या ठिकाणी तुझीच मूर्ति विराजमान झालेली दिसेल. अहोरात्र तुझ्यावांचून मला काही दिमत नाही–सुचत नाही. कुठल्याच कामाकडे लक्ष्य म्हणून कसं तें लागत नाही. तुझ्या नुसत्या दर्शनानं माझ्या साऱ्या अंतःकरणोर्मि कशा उचंबळून येतात. "

" अस्सं ! एकूण तुमचं माझ्यावरील प्रेम हे इतक्या क्षुद्र कोटींतले आहे तर ! हो, क्षुद्रच नाहींतर काय ? तुम्हीं आता सांगितलेलीं सारी लक्षणं हीं तुमच्या विकारवशतेंचीच द्योतक आहेत. खऱ्या प्रेमानं मनुष्याचं मन अधिकाधिक स्वतंत्र होत जातं. कर्तव्याकडे दुर्लक्ष करून अहोरात्र एखादीचं चिंतन करणारं, तिचा गुलाम होऊन रहाणारं मन खऱ्या प्रेमाचा अभाव दर्शवित. जा ! असली बाष्कळ बडबड इतःपर माझ्यापुढे करीत जाऊं नका. " तिनें बजावले.

तिचा सारा अनुभव हा अशाच प्रकारचा होता. आतांपर्यंत बहुधा खोटीं नाणींच तिच्या आढळांत आलेलीं होती. त्यामुळे उपरनिर्दिष्ट लघुकथेतील नायकासारख्या खऱ्या नाण्याचें समाजांत अस्तित्व तरी असूं शकेल काय याविषयीं तिचें मन साशंक झालें होतें.

टेबलावरील पसारा तसाच टाकून ती उठली आणि खोलींतल्या खोलींत दोनचार येरझारा घालून बाजूच्या खिडकीशीं क्षणभर उभी राहिली. समोरून जाणारे–बाह्यतः अगदीं संभावित दिसणारे दोघे तरुण तिला खिडकींत पहातांच रस्त्यावरच थबकून उभे राहिले. आणि तिच्याकडे पाहून डोळे मिचकावित ते आपसांत कांहीं कुजबुजूं लागले.

‘ पहावें तिकडे खोटें नाणें ! जगांत खरें नाणें नाहींच का ? ’ तिला त्या तरुणांच्या मानसिक अधःपाताची कींव आली. ‘ हल्लींची तरुण पिढी इतकी का शिथिल झाली आहे ? शीलपावित्र्य हा शब्द यांच्या कोशांतच नाहीं का ? समाजानें आणि राष्ट्रानें आपल्या उद्धाराकरिता अशाच तरुणाच्या तोंडाकडे पहावयाचें का ? मग त्याच्या उद्धाराची आशाच नको. ’ हे विचार झर्‌कन् तिच्या मनात येऊन गेले.

ती पुन्हा येऊन खुर्चीवर बसली. आणखी दोन बाडे तिनें वाचून टाकलीं. पसंतीनापसतीचे त्याच्यावर शेरे मारून त्याची वर्गवारी केली. आणि किती वाजले ते समजण्यासाठीं वर मान करून घड्याळाकडे पाहिलें. तितक्यांत तिची नजर सहज खालीच्या दाराकडे वळली. दाराच्या फटींतून कोणीतरी आपल्याकडे सारखा टक लावून पहात असल्याचे तिला दिसले.

कामाच्या भाराने ती आधीच संत्रस्त झाली होती. त्यात त्या मघाच्या तरुणाच्या कृतीमुळे तिला चीड आली होती. त्यात आणखी ही भर पडताच ती एकदम उसळली.

“ कोण ते ?–शिष्टाचार म्हणून वागण्याचा एक प्रकार आहे हे आपणाला ऐकून देखील माहीत नाही वाटत ? एखाद्या अनोळखी तरुणीकडे निर्लज्जपणें सारख टक लावून पाहण्यात आपण सभ्यता चट्‌मारी गुंडाळून ठेवीत आहो, हें चुकूनसुद्धा तुमच्या मनात येऊ नये म्हणजे आश्चर्यच म्हणावयाचं !—पण शिष्टता जर मुळीं आडातच नसली तर पोहऱ्यात तरी कुठून येणार ? ” रागाच्या भरात तिच्या थरथरणाऱ्या ओंटातून हे शब्द आवेगाने बाहेर पडले.

दारात उभा असलेला तरुण हे तिचे उद्गार ऐकून स्तंभितच झाल्यासारखा दिसला. शेवटचे शब्द तर त्याच्या मनाला चांगलेच झोंबले. आपल्यावर हा अकस्मात हल्ला होण्याचें कारण काही केल्या त्याच्या ध्यानात येईना.

“ बाई, आपण माझ्याबद्दल भलताच ग्रह करून घेतलेला दिसतो. शिष्टता व सभ्यता याचं मला बाळकडूच पाजल असल्यामुळें कोणाही अनोळखी तरुणीकडे टक लावून पाहण्यासारखं असभ्य कृत्य माझ्या हातून कालत्रयीं घडणार नाहीं. इतकेंच काय पण शिष्टाचाराचा माझ्यांत अभाव असता तर आज या ठिकाणीं येण्याची मला गरजच पडती ना. रामराव शहापुरे याचा आपल्याला निरोप कळविण्यासाठींच मला इकडे येणं भाग पडलं. पण आपल्याला मी पूर्वीं कधींच पाहिलं नसल्यामुळें इकडे येताच मी थोडासा घुटमळलों. ”

" पण असा अनोळखी माणसाबरोबर सांगून पाठविण्यासारखा निरोप तरी काय आहे बाबांचा ? "

" त्यांनीं आपल्याला X X इस्पितळांत येऊन भेटण्यास सांगितलं आहे. "

" इस्पितळांत ? अन् तें कां ? " अधीरतेनें तिनें विचारलें.

" तें सारं तुम्हांला तिकडेच कळेल. " इतकें बोलून तो तरुण निघून गेला. मात्र जातां जातां " स्वतःच्या सौंदर्याबद्दल एकदां का घमेंड उत्पन्न झाली म्हणजे दुसऱ्याची सहज कृतिसुद्धा याना सदोष दिसूं लागते. " असा विचार त्याच्या मनांत डोकावल्याशिवाय राहिला नाहीं.

एका अपरिचित व्यक्तीच्या मनोभावना आपल्याकडून दुखावल्या गेल्या याबद्दल तिच्या मनाला भारीच चुटपुट लागून राहिली; पण त्याबद्दल अधिक विचार करण्याजोगी त्यावेळीं तिची मनस्थिति नव्हती. एखाद्या महत् दुःखाच्या लाटेपुढें ज्याप्रमाणे बारिकसारिक संकटाच्या तुषाराचें कांहींच वाटत नाहींसें होतें त्याप्रमाणेंच आपले वडील इस्पितळात असल्याचें वृत्त कानीं पडल्यापासून इतर गोष्टी तिच्या चित्ताला स्पर्शही करीनातशा झाल्या होत्या. ती बावरल्यासारखी झाली होती. मातृहीन जलबालेला एका रामरावावाचून मायेचें असें अन्य स्थानच नव्हतें. त्यामुळें माता आणि पिता या दुहेरी नात्यानें तिचें आपल्या वडिलावर निस्सीम प्रेम होतें. उलटपक्षीं रामरावांनाहि जलबालेशिवाय अन्य अपत्य नसल्यामुळें तेही तिच्यावर अपत्यस्नेहाचा अविरत पाऊस पाडीत असत. अशी स्थिति असल्यामुळें X X इस्पितळाच्या विवक्षित वार्डात पाऊल टाकीपर्यंत तिच्या मनात वडिलांविषयींचे विचार सारखे धुमाकूळ घालीत होते, हें कांहीं निराळें सांगावयास नकोच.

रामराव आतां शुद्धीवर आले होते. जलबाला आली ती जवळ जवळ धांवतच त्यांच्या खाटेकडे गेली. तिला पहातांच रामरावाना झालेला आनंद त्यांच्या प्रशांत नजरेंत चमकल्याविना राहिला नाहीं. त्यांना जरी आतां विशेष बोलवत नव्हतें तरी, आपण घरीं कसे येत होतों, इतक्यात आपल्याला भोंवळ येऊन आपण खालीं कसे पडलों, त्या अपरिचित तरुणानें लगेच औषधपाण्याची सोय करून आपणांस इकडे आणण्याची कशी खटपट केली इत्यादि सारी हकीकत त्यांनीं हळूहळू तिच्या कानावर घातली.

" त्यांना बिचाऱ्यांना मात्र माझ्यासाठीं फारच त्रास सोसावा लागला. मी

पूर्णपणें शुद्धीवर येईपर्यंत ते सारखे माझ्याजवळ बसून राहिले होते. फारच गोड स्वभाव ! ” अर्थात् हें सर्व त्या मघांच्या तरुणाला उद्देशूनच ते बोलले.

तो तरुण आता जलबालेच्या नजरेसमोर उभा राहिला. रागाच्या भरांत एका कुलीनाच्या शीलावर शिंतोडे उडविण्याजोगे अपमानास्पद शब्द आपल्या तोंडातून कसे बाहेर पडले याचे तिला आता राहून राहून अनुतापयुक्त आश्चर्य वाटू लागले. त्याच्या जागीं दुसरा कोणी असता तर संतापानें डोक्यात राख घालून आपल्याशीं प्रत्युत्तरादाखल एक शब्दही न बोलता मागल्या पावलीं परत गेला असता. पण त्यानी—त्यानीं शातपणान सारं ऐकून घेतलं आणि बाबाचा निरोप आपल्याला कळविला ! खरच आपल्या या अशा वागणुकीमुळे त्याच्या मनाला काय वाटल असेल बरं ? अशा तऱ्हेच्या अनंत विचारानीं तिची मनस्थिती अगदीं चमत्कारिक झाली. तिचे मन तिला खाऊं लागले. आपल्या उतावळ्या स्वभावाला ती दोष देऊं लागली. अविचारीपणाने आपल्या हातून सुक्याबरोबर ओलेहि जाळले गेले याचें तिला फार वाईट वाटले. आतां पुन्हा त्या तरुणाची कधी भेट झाली तर त्याची सपशेल माफी मागून मोकळें होणें एवढाच काय तो मार्ग तिला शिल्लक उरला होता.—‘ पण होईल का पुन्हा त्याची भेट ? ’ तिच्या साशंक मनानें प्रश्न केला.



होय ! तिला त्याची पुन्हां भेट झाली; पण ती त्यानंतर तब्बल तीन वर्षांनीं ! आणि तीहि अत्यंत चमत्कारिक परिस्थितींत. या तीन वर्षांच्या कालांत अनेक घडामोडी होऊन गेल्या होत्या. सर्वभक्षक काळानें तिच्या वडिलांना तिच्यापासून हिरावून नेले होतें, आणि तिच्या आयुष्यातील या महत्वाच्या स्थित्यंतरामुळें तिच्या जीवनात आतां बराच फेर झालेला दिसून येत होता. तिच्या पूर्वीच्या गोंडस गुलाबी चेहऱ्यावर आता अकाल गांभीर्य व उदीसीनता यांचें साम्राज्य पसरलेलें दिसून येई. ती अलीकडे कुठल्याच कामांत विशेष लक्ष्य घालीत नव्हती. तिचा उत्साह पार मावळून गेला होता. तिच्या प्रेमाला जोपर्यंत वडिलांचा आधार होता तोपर्यंत ती त्याच प्रेमांत समाधान मानून होती. पण आतां तो आधार तुटल्यामुळें आपल्याला आतां असेंच निष्प्रेम आयुष्य कंठावें लागणार कीं काय हाच विचार अलीकडे तिला भंडावून सोडूं लागला होता.

त्या दिवशीं ‘ उन्नति ’ कचेरींतील काम संपवून ती जरा लवकरच घरीं

आली. सारा दिवस मासिकाच्या कामाचा उरक काढून झाल्यावर संध्याकाळीं घरीं येऊन पुन्हां तिला स्वयंपाकाच्या कामाला लागणे भाग पडत असे. पण आज तिला भूकच नव्हती म्हणून म्हणा अगर स्वयंपाक करण्याच्या दगदगी-मुळे म्हणा, तिनें आज जेवणाला टाळाच देण्याचे ठरविले, आणि आपली भूक कॉफीच्या एका प्याल्यावरच भागवून ती स्वस्थ पडून राहिली.

नेहमींप्रमाणे आतांहि तिच्या डोक्यात विचाराची एकच गर्दी उसळली होती. पण हे तिचे सर्व विचार एकाच बिंदूभोवती धिंगाणा घालीत होते. जीवनातील शुष्कता घालविण्याकरिता तिला एखाद्या प्रेमळ हृदयाची फारच उणीव भासूं लागली होती. प्रेम करून घेण्यापेक्षा प्रेम करण्यातच अधिक सुख असते हा सिद्धात तिला पटल्यामुळे आपल्याला योग्य असा जोडीदार शोधून काढण्याच्या कामात ती अलीकडे गुंतली होती. तिच्या ओळखीच्या मंडळात अनेक सुशिक्षित व धनिक तरुण होते. पण ते सारे कमीअधिक प्रमाणानें तिच्या सौंदर्यावर लुब्ध झाल्यामुळेच तिच्यावर प्रेम करू लागले होते. अर्थात् असले क्षणजीवि प्रेम सौंदर्याच्या नाशाबरोबरच नष्ट पावणार अशी तिची पूर्ण खात्री होती. तिनें विचार करकरून पाहिला; पण आपल्या हृदयाशी समरस होणारें एकही हृदय तिच्या कल्पनाचक्षूंना दिसून आलें नाहीं.

अशा प्रकारच्या विचारात तिचा आणखी किती वेळ लोटला असता ते कांहींच सागतां आलें नसते. पण तितक्यात कोणीतरी दारात उभे असल्याचा भास झाला म्हणून तिनं तिकडे पाहिलें.

एक कुलीन दिसणारी पण साधारण उतार वयाची बाई दारांत उभी होती.

" काय हवं आपल्याला ? " जलबालेने बसल्या जागेवरून उठत विचारले.

" तुमची तेवढी खुर्ची जरा मिळण्यासारखी असली तर हवी आहे थोडा वेळ. आमच्या घरीं आतांच डॉक्टर आलेले आहेत त्याना बसायला—"

" हो, हो ! न्या की ! " असें म्हणत जलबालेनें स्वतःच खुर्ची आणून तिच्या स्वाधीन केली.

तिच्या मजल्यावरच्या शेवटच्या खोलींत आज नवीन बिऱ्हाड आल्याचें तिला सकाळींच समजलें होते. त्यामुळें हीच ती बाई असावी असा तिनें सहजच तर्क केला. तिच्या आवाजांत मार्दव आणि प्रेमळपणा यांचा सुंदर मिलाफ झालेला दिसून आल्यामुळे सहजच जलबालेचे मन तिनें आपल्याकडे आकर्षून

घेतले. आणि ही नवीन बाई कोणत्या संकटात आहे व तिच्या घरी कोण आजारी आहे ते कळावे म्हणून तीही त्या बाईच्या मागोमाग गेली.

एक तरुण खाटेवर निजला होता. व डॉक्टर त्याचे डोळे कसोशीने तपासण्यात गुतले होते. जवळच आपली आशायुक्त व आतुर नजर डॉक्टराच्या चेहऱ्याकडे लावून ती बाई उभी होती. ही त्या तरुणाची आईच असावी हें जलबालेने ताडले.

" डॉक्टरसाहेब, होतील का हो याचे डोळे पूर्वीसारखे ? ती बाई अधीऱ्या स्वराने विचारीत होती.

" आशेला बरीच जागा आहे. मी प्रयत्नाची शिकस्त करून पाहीन. तुम्ही बिलकूल गडबडू नका. " असें आश्वासन देऊन डॉक्टर निघून गेले.

" या हो, आत या; अशा बाहेर का उभ्या ? " जलबालेला बाहेरच उभी असलेली पाहून ती बाई म्हणाली.

ती हलकेच आत आली आणि तिने त्या तरुणाकडे एक दृष्टिक्षेप केला. ती एकदम चमकली. तीन वर्षांपूर्वी ज्याचा आपण अकारण अपमान केला होता तोच हा तरुण हे तिनें ओळखले. केवढे आश्चर्य !

" आज सहा महिने झाले, " ती बाई सांगत होती, " याची दृष्टि हळूहळू मंद मंद होत गेली, आणि लवकरच त्याला काहीच दिसेनासें झाले. तेव्हापासून सारखीं औषधें चालू आहेत. अनेक डॉक्टर झाले. पण गुण येण्याचे काहीच चिन्ह दिसेना.—आताच डॉक्टर येऊन गेले, त्यांची बऱ्याच लोकांकडून तारीफ ऐकली. म्हटलं पहावं एकदा प्रयत्न करून—म्हणून इकडे आलों. " थोडा वेळ थांबून ती पुढे म्हणाली, " या अफाट जगात माझ्या जीविताचा हा एवढाच काय तो आधार आहे. माझा जयंत म्हणजे एक रत्न आहे " तिच्या डोळ्यांत पाणी चमकले.

" आई, प्रत्येक आईला आपला मुलगा म्हणजे एक रत्नच वाटतं. त्याला तू तरी कशी अपवाद ठरणार ? " जयंत निजल्या निजल्याच पण हंसत हंसत बोलला. कुठून तरी आपल्याबद्दलच्या तिच्या दुःखाचा तिला विसर पडावा एवढाच त्याचा उद्देश होता.

जयंताच्या आईची व जलबालेची हळुहळू बरीच गट्टी जमली. उमाबाईंच्या लाघवी स्वभावामुळें जलबालेला तिच्याबद्दल एक प्रकारचा आपलेपणा वाटू

लागला. वेळीं प्रसंगीं लहान मोठ्या कामात ती उमाबाईंना हरतऱ्हेची मदत करूं लागली. जयंताच्या मधुर व बोलक्या स्वभावामुळें त्याच्याशी बोलण्या-चालण्याचे प्रसंगही तिच्यावर वरचेवर येऊं लागले. आणि पुढे पुढे तर कधीं एखादे चागलें पुस्तक वाचून दाखवून अगर एखादी सुंदर कविता आपल्या गोड गळ्यानें म्हणून ती त्याचे मन रिझवूं लागली. असे करण्यात हळुहळू तिलाही एक प्रकारचा आनंद वाटूं लागला. जयताच्या रसाळ व विविध माहि-तीनें भरलेल्या गोष्टींत तिचे मन रमूं लागले. तिच्या शुष्क जीवनाला आता हळुहळू पालवी फुटूं लागली, आणि तिचे उदास हृदय फुलारूं लागले.

इतकें झालें तरी आपली पूर्वीची ओळख न देण्याबद्दल मात्र तिनें मुद्दामच खबरदारी घेतली. असें करण्यात केवळ एक मौज करावी एवढाच तिचा उद्देश होता. ती ' जॉल ' या नावाने सर्वास परिचित असल्यामुळे जयतही तिला त्याच नावानें संबोधित असे.

त्या दिवशीं ' उन्नति ' मासिकातील स्वतःची एक गोष्ट ती त्याला वाचून दाखवीत होती.

" कुणी लिहिली आहे ही गोष्ट ? " मधेच जयंताने विचारले.

" खुद्द संपादिकेनेंच ! ' जलबाला शहापुरे ' यानीं ! "

" हूं ! " असें म्हणून तो गप्प राहिला. त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या.

" अगदीच टाकाऊ वाटली वाटतं ही गोष्ट ? " त्याचा तो तुच्छतादर्शक उद्गार ऐकून तिनें विचारलें.

" असंच कांहीं नाहीं, पण मला आपली एक जुनी आठवण झाली. "

" जुनी आठवण ? अन् ती कसली बाई ? " तिनें मुद्दामच वेड पांघरून विचारलें.

" कांहीं एवढी सांगण्यासारखी नाहीं. "

" तरी पण ! "

तीन वर्षांपूर्वी जलबालेनें आपला कसा अपमान केला होता हें त्यानें तिला सांगितलें.

" भारीच गर्विष्ठ दिसली मला ती ! " तो म्हणाला.

" कशावरून म्हणता तुम्हीं हें ? "

" तिला आपल्या सौंदर्याचा आणि शिक्षणाचा भारीच तोरा वाटत होता असं दिसलं. एखाद्या मासिकाची संपादिका होणं म्हणजे आकाशाला हात लाग-

त्यासारखंच तिला वाटत असावं. तेव्हांपासून माझ्या मनांत तिच्याविषयीं अशी अढी बसून राहिली आहे कीं, कुठेंही तिचं नाव ऐकलं कीं कपाळाला आंठ्या पडल्याशिवाय राहत नाहींत. ''

'' पण ती माझी मैत्रीण आहे. '' थोडी गम्मत करण्याच्या उद्देशानें तिनें म्हटलें. '' आणि कुणी सांगावं तिच्याबद्दल जसा आपल्याला तिरस्कार वाटतो तसा तिची मैत्रीण म्हणून माझ्याबद्दलही हळुहळू वाटूं लागेल ! ''

'' भलतंच ! जॉल, तुझ्यात नि तिच्यात जमीन अस्मानाचं अंतर आहे. तिच्या कुढ्या मनाची तुलनाच कशाला करा ! माझ्यासारख्या एका अपरिचित अधाशीं आपलेपणाच्या भावनेने वागून तूं मला आणि माझ्या प्रेमळ मातेला अत्यंत उपकृत करून ठेवल आहेस ! ते फेडावयास माझं सर्वस्व द्यावं लागलं तरी मी मागें पहाणार नाही. ''

'' मला आपल सर्वस्व नको. '' ती म्हणाली. '' मी त्या योग्यतेची आहे असं मला वाटत नाहीं. मला फक्त—'' इतके बोलून ती स्तब्ध राहिली.

'' फक्त काय ?—''

'' आपल्या विशाल हृदयातील एखादा लहानसा कोपरा जरी माझ्या वाट्यास आला तरी मी माझ जीवन आनदानें व्यतीत करण्यास तयार होईन.''

'' जॉल, मी आधळा आहे ! '' वस्तुस्थितीची जाणीव करून देण्याच्या उद्देशाने तो म्हणाला.

'' पण आपलं हृदय तर आधळं नाहीं ना ?

तो हंसला,--अगदी मनापासून हंसला.

यानंतर दोन महिने केव्हाच निघून गेले. जयंताला आता गुण पडण्याचीं स्पष्ट चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं. डॉक्टरनाहि हुरुप चढला. आजपासून आठव्या दिवशीं जयंताला चागलें दिसूं लागेल अशी हमी त्यांनीं दिली.

आठवा दिवस उजाडला. आज जयताच्या डोळ्याची पट्टी सोडली जाणार होती. बरेच दिवस पारखें झालेले जग तो आज आपल्या डोळ्यांनीं पहाणार होता. त्याची चित्तवृत्ति उल्हसित दिसत होती. त्याच्या आईला तर अस्मान ठेंगणें झालें होते.

डॉक्टर आले, इकडचा तिकडचा थोडा उपचार करून त्यांनीं हळुहळु पट्टी सोडली.

" जयंत दिसतं का तुम्हांला?--"

" होय. डॉक्टर!" जयंत आनदानें म्हणाला. " मला चांगलंच दिसत आहे. हे तुम्हीं, ही इकडे आई अन् ही–ही–" जलबालेकडे दृष्टि जाताच तो चमकला.

जलबालेला ओळखण्यास त्याला फारसा वेळ लागला नाहीं.

आपण हातीं घेतलेल्या 'केस'मध्ये विजयश्रीनें आपल्याला माळ घातली या आनंदानें डॉक्टर निघून गेले. आपल्या लाडक्या पुत्राला दृष्टिलाभ झाला म्हणून हर्षातिरेकानें उमा आपल्या कामाला लागली.

पण जयंत?

आपल्याला आता पूर्ववत् दिसूं लागले याचा त्यालाहि आनद झाला होता. जलबालेकडे नजर जातांच त्याच्या आनंदांत थोडे विरजण पडल्यासारखे झाले. आपल्या कल्पनेच्या कुंचल्यानें आपल्या आवडत्या जॉलची त्याने एक मूर्ति काढलेली होती. पण तिच्याऐवजीं जलबाला दृष्टीस पडताच त्याचा चेहरा एकदम उतरल्यासारखा झाला. जॉल आणि जलबाला या दोन व्यक्ति नसून एकाच व्यक्तीचीं दोन नांवें आहेत, हे त्याच्या ध्यानीं येताच त्याचा आनंद मावळला आणि त्याची मुद्रा विचारमग्न दिसूं लागली.

केवळ मौज करण्यासाठीं म्हणून जलबालेनें आपले खरे नाव जयंतापासून लपवून ठेवले होतें. आपल्यावर प्रेम करणारी आणि आपल्या प्रेमास पात्र झालेली जॉल हीच ती पूर्वी आपल्याला भेटलेली जलबाला हे जेव्हा त्याला कळेल तेव्हा 'जलबाले'विषयींचा त्याचा पूर्वग्रह साफ बदलून जाईल. 'जॉलशी' ज्या प्रेमानें आणि आपुलकीनें तो वागतो तितक्याच प्रेमानें तो 'जलबाले'शीहि वागावयास लागेल अशी तिची बालबाल खात्री होती. पण हा तिचा अंदाज चुकीचा ठरला. त्याच्या मुखावर नाखुषीचे मेघ पसरलेले पाहून ती बावरल्यासारखी झाली.

" आपल्याला आता कसं वाटतं?" काहीं तरी बोलायचें म्हणून ती बोलली.

" बरं वाटतंय्!" मान बाजूला वळवून त्यानें उत्तर दिलें.

" हे काय हे असं? आपल्याला प्राप्त झालेल्या या नूतन दृष्टीनें आपल्या जॉलकडे एकवार डोळे भरून पहावं असदेखील नाहीं का वाटत आपल्याला?"

" नाहीं कस? जॉल तर माझाच प्राण आहे. तिच्याकडे कल्पांतापर्यंत पहात राहिलं तरी तें मला थोडंच वाटणार! पण माझ्या जॉलला मी सदैव मनश्चक्षूंनींच पहावं, चर्मचक्षूनी पाहूं नये अशीच ईश्वराची इच्छा दिसते."

" असं का म्हणता ? चर्मचक्षूंना जोपर्यंत पहाण्याचं सामर्थ्य नव्हतं तोंपर्यंत तुमचं म्हणणं ठीक होतं पण आता सुदैवानं आपल्याला चागलं दिसूं लागल्यामुळें आपल्या जॉलला पहायला कोणती हरकत आहे ? "

" हरकत ?—हरकत तर मोठीच आहे ! माझ्यापुढें उभी राहून बोलत असलेली व्यक्ति ही जिच्यावर मी आजपर्यंत प्रेम करीत आलो ती जॉल नसून जिच्याबद्दल माझ्या मनात आतापर्यंत तेढ बसत होती व जिला मी परकी—परस्त्री असे मानीत आलो ती जलबाला होय. जलबाला पूर्वी मला परस्त्री होती, आताहि परस्त्रीच आहे आणि पुढेंहि परस्त्रीच राहील !

" म्हणजे आपण आतापर्यंत दिलेली वचने आणि बोललेले बोल हे सर्व व्यर्थ गेले म्हणानायचं ! एखाद्याला असं आपल्या नादी लावून मग तोंडघशीं पाडणं चागलं का ?—"

" माझ्या नाजुक मनोभावनांची आपल्याला नीटशी कल्पना आली नाहीं असं दिसत. जिला मी वचनं दिली, जिला मी आपली म्हटली, ती माझ्या कल्पनासाम्राज्यात नांदणारी जॉल होय. तिला मी कधीहि फसवणं शक्य नाही. सदैव हृदयात बाळगून तिच्याशी मी एकनिष्ठ राहीन ! पण ते स्थान आपणाला मिळणं मात्र शक्य नाही. आपल्या दोघांमधील परकीपणाचा भाव नष्ट होणं शक्य नाही. तसं केल्यास माझ्या एकनिष्ठपणास बाध येईल. असं नाही का तुम्हाला वाटत ?"

तिनें काहीच उत्तर दिले नाहीं. ती तिथेच बसून किती वेळ तरी विचार करीत होती.

" ठीक आहे ! " बऱ्याच वेळानें ती म्हणाली. तिचा चेहरा आनंदित दिसूं लागला.

" केवळ कल्पनेनेंच जिचं दर्शन घेतलेलं आहे अशा जॉलशी सर्व आयुष्य घालविणे जर आपल्याला अवघड वाटत नाही तर ज्याना मी प्रत्यक्ष पाहिलेलं आहे, ज्याच्या संगतींत मी बराच काळ घालविला आहे त्या मूर्तीच्या कल्पनेंत मला तरी सारं आयुष्य घालविणं कठीण का वाटाव ? "

जड पावलांनीं पण समाधान वृत्तीने ती आपल्या खोलीत निघून गेली.

# आदर्श (!) नवमतवादी

" काय सदुभाऊ, जेवण आटोपल का ? " पोटावरून हात फिरवीत दामु-अण्णानीं विचारलें.

" अहो, कसलं जेवण नि कसलं काय ! आमच्या मागच्या ह्या एकएक विवंचना "—

" ऑ ! तुमच्या मागे विवंचना ? आश्चर्य आहे म्हणायचं ! सदुभाऊ, मी तर तुम्हाला एक अत्यंत सुखी प्राणी समजत होतो ! "

" अहो तुम्हीच का–सारा गावच तसं समजत होता ! फार कशाला ? मीसुद्ध· स्वतः अगदीं या घटकेपर्यंत सुखीच समजत होतो ! "

" मग अगदीं याच घटकेला तुमचं सुख एकाएकी कोणी हिरावून नेलं बुवा ? "

" दामुअण्णा, हें पत्र वाचा म्हणजे सारं कांहीं तुह्माला कळून येईल ! आज-पर्यंत आमचा गजानन म्हणजे एक सालस, मनमिळाऊ, आज्ञाधारक आणि प्रेमळ मुलगा आहे असंच आम्ही समजत आलो. आणि–तसा तो होताहि ! पण हें पत्र वाचल्यापासून त्याच्या डोक्यात काय काय वेडं शिरत आहेत आणि आणखी शिरणार आहेत याचा काहींच अंदाज होईनासा झाला आहे.

सदुभाऊनीं दिलेलें पत्र घेऊन दामुअण्णा वाचूं लागले.

" **बाबा,**

तुमचें पत्र आतांच मिळालें. तुम्ही लिहिता " सुनबाईनीं आणखी निदान चार महिने तरी इकडेच रहावें असें माझें व आईचे मत आहे. आल्यासारखी तिला विश्रांतीहि मिळेल आणि अनायासें हवापालटहि होईल. " बाबा तुमच्या दृष्टीनें हें सारे ठीक आहे. माणसें विमानातून जाऊं लागलीं तरी तुम्ही आपले खटाऱ्याला चिकटून राहिलां आहात ! आमच्यासारख्या तरुण पिढीच्या आचारविचारांत किती प्रगति झाली आहे याचा तुम्हाला थांगपत्ता कसा लागावा ! दिवसेंदिवस भौतिक शास्त्रांत जे नवीन नवीन शोध लागत आहेत—मानस·

शास्त्रांत जे नवे नवे सिद्धांत प्रस्थापित केले जात आहेत, त्यांचा ओनामाहि तुम्हांला माहित असण्याचा संभव नाहीं ! असो, जास्त लांबण न लावतां एकदम मुद्यावर येतों. हे पत्र पोहोंचताच सुनबाईला तावडतोब इकडे पाठवून द्यावी. त्यांत कसूर न होणें. बाबा, मनुष्यांत ज्या काहीं वासना अगर प्रेरणा असतात त्यांत कांहीं नीच तर काहीं उच्च असतात असे तुम्हीं म्हणत असता. त्यात ज्या नीच व पाशवी वृत्ति असतात त्याचे निग्रहपूर्वक दमन करावें आणि चांगल्या वृत्तीचा परिपोष करावा हे तुमचे म्हणणे ! पण हे तुम्हा जुन्या लोकाचे म्हणणं आमच्या अलिकडच्या मानसशास्त्राने अगदी फोल ठरविलं आहे. ते शास्त्र सागते--निदान त्या शास्त्राची ज्याना माहिती आहे असा आमचा समज आहे ते सागतात कीं, मनुष्यात असलेल्या सगळ्या वृत्ति चागल्याच असतात. त्या सगळ्या वृत्तींची त्याला गरज असते. शिवाय वासना दाबल्या तरी त्या मरत नाहींत–तुम्ही विचाराल, भोगून तरी त्या मरतात का ? पण याचे उत्तर अजून माझ्या वाचनांत कुठे न आल्यामुळें तें न देणेंच बरें.—

आता ज्याला तुम्ही पाशवी मनोविकार म्हणता त्या कामविकाराचाच प्रश्न घ्या. आमचे मानसशास्त्र सागतें कीं या कामविकाराचा मानवी जीविताशीं अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध आहे. मनुष्याच्या हरएक लहान मोठ्या कृतीवर या विकाराचा पगडा बसलेला असतो. या कामप्रेरणेचा जर का निरोध केला तर त्यापासून अनेक दुर्धर आपत्ति उद्भवतात. या निरोधनापसून शरीरावर आणि मनावर अनेक अनिष्ट परिणाम घडून येतात आणि तुमचं सोन्यासारखं जीवन मातीमोल होऊन जातं. भूक लागली कीं जेवणें हें जसें इष्ट—त्याला जसं कोणी नांव ठेवीत नाहींत, तद्वतच कामप्रेरणेचा उद्भव होताच उपभोगानें तिचा उपशम करणें हेंच आधुनिक मानसशास्त्र कंठशोष करून सांगते. आणि आम्हालाहि तें तत्काळ पटतें. तात्पर्य काय, विवाहित माणसांनीं चार महिने पत्नीला आपणापासून दूर ठेवणें म्हणजे आपल्या साऱ्या आयुष्याची धूळधांड करण्यासारखेंच आहे. अर्थात्, माझी शारीरिक व मानसिक हानि टाळण्यासाठीं आपण सौभाग्यवतीला लवकर पाठवून द्याल अशी आशा आहे. ”

आपला

गजानन

" हं. एकूण तुमच्या चिरंजीवाच्या डोक्यात नवमतवादाचं वारं शिरलेलं दिसतं ! " दामूअण्णा उद्गारले.

" नवमतवाद ? हा कसला बुवा आणखी नवा वाद ? आधींच आमच्या दुर्दैवी देशांत वाद कमी म्हणून या नवीन वादाची त्यात भर घालण्यात आली आहे की काय ? "

" ते कांही विचारूं नका सदुभाऊ. आजकाल तुम्हाला कुठंहि काहीं लोक-विलक्षण स्वैराचाराला उत्तेजन देणारीं तत्वें आढळून आलीं की या तत्त्वाचा नव-मतवादांत समावेश होतो म्हणून खास समजावं.—आतां तुम्ही असं करा सदु-भाऊ, त्याच्यावर रागवाल बिगवाल तर स्वारी अधिकच बिथरेल. तव्हा त्याला लिहा कीं, सध्या तुझी आई आजारी आहे. तिला जरा बर वाटताच सूनबाईला पाठवून देतो. ".



" दामूअण्णा, हे पाहिलंत का चिरंजीवाचं काय उत्तर आलं ते ? दामू-अण्णाच्या हातात पत्र देत सदुभाऊ म्हणाले.

" काय म्हणतात ते ? "

" वाचूनच पहा म्हणजे समजेल ! "

दामूअण्णानी पत्र उलगडून वाचायला सुरवात केली.

" बाबा,

आपले पत्र वाचून मला फार आश्चर्य वाटलें. रागही आला तुमचा ! तुम्हीं व आईनें मिळून आजवर जे माझ्यासाठीं कष्ट सोसलेत त्याचा सगळा पाढाच जवळ जवळ आपण पत्रात वाचला आहे. पुत्रप्रमाचे आणि मातृपितृभक्तीचे आपण गायिलेले गोडवे ऐकून एखादा जीर्णमतवादी तेव्हांच विरघळून गेला असता ! पण माझ्यासारखा नवमतवादी त्याला थोडीच भीक घालणार ! अप-त्यप्रेमाच्या जुन्यापुराण्या बुरसलेल्या कल्पनाचा आमच्या मानसशास्त्रानें पार धुव्वा उडवून टाकला आहे ! आईचं मुलावरील प्रेम दिव्य असतं असं आपलं म्हणणं ! पण आमचं नवीन शास्त्र सांगतं कीं आईच्या प्रेमाइतकं स्वार्थी प्रेम जगात दुसरं कोणतंच नाहीं ? आई तान्हुल्याला पाजते ती त्याची भूक शांत व्हावी म्हणून नव्हे, तर तसं करण्यावांचून तिच्याने राहवत नाहीं म्हणून.—तिला तसं करण्यांत एक प्रकारचं सुख होतं म्हणूनच ती त्याला पाजते. आई आपल्या

मुलाला चागल्या चांगल्या कपडयालत्त्यांनीं आणि दागिन्यांनीं मढवते तें कांहीं मुलाला सुख व्हावे म्हणून नव्हे, तर तसं करण्यात तिला एक प्रकारच सुख होत असतं म्हणूनच तिच्या या कृति घडतात ! या बाबतींत आमचा एक मानसशास्त्रज्ञ फ्रॉइड हा तर इतका पुढे गेला आहे कीं–पण जाऊं द्या ! तो पाढा तुमच्यापुढे वाचण्याची काही गरज नाहीं. माझ म्हणणं अस की, माझ्यासाठीं आईबापांनीं जे जे काहीं आतापर्यंत केले असें आपण म्हणता तें सारं काही त्यांनीं आपल्याच सुखासाठीं केलेलं आहे. त्याचे उपकार मला नकोत !

कुटुंबाच सुख—कुटुंबाचं हित हे शब्द आपल्या पत्रात बरेचदा आलेले आहेत ! पण कुटुंबविटुंब हे सार थोताड आहे असे आम्हा नवमतवाद्याचे मत आहे. मनुष्य सज्ञान झाला, त्याचं लग्न झालं की त्याने आपल्या पत्नीला घेऊन निराळा संसार थाटावा असंच आमचं मत आहे. कुटुंबपोषणाच्या नावाखालीं भाराभर माणसं पोसण्याची जबाबदारी त्याने का म्हणून घ्यावी ? स्वतःच्या सुखाच्या स्वैरसंचाराला कुटुंबपोषणाचे बंधन का म्हणून घालून घ्यावं ? असो, जास्त लिहिण्यात काहीं अर्थ नाही ! घटस्फोटाचा कायदा असता तर मी त्याचा लगेच फायदा घेतला असता ! कारण पत्नीने जास्त दिवस पतीला सोडून राहणें एवढेंच कारण घटस्फोटाला पुरे आहे असे माझे मत आहे. पण तसा कायदा तूर्त नसल्यामुळें नाइलाज आहे. बाकी घटस्फोट न करताहि आज आम्हाला अनेक बायका करण्याची सवलत आहेच म्हणा ! तरी आतां अधिक कालगत न लावता सौभाग्यवतीची ताबडतोब रवानगी करावी.

आपला,

**गजानन**

" तारू फारच भडकलेलं दिसतंयू " पत्राची घडी करीत दामूअण्णा म्हणाले.

" मग याला उपाय ? "

" उपाय कसला ? द्या पाठवून सूनबाईला आणि बसा स्वस्थ ! हळुहळु आपणहूनच येईल ताळ्यावर ! "



**सहाच** महिन्यानंतरची गोष्ट. सदुभाऊंनीं सामानाची बांधाबांध चालविलेली पाहून दामूअण्णांना आश्चर्य वाटलें !

" इतक्या धादलीनें कुठें निघायची तयारी चालली आहे बुवा ! "

" हिला जरा पोंहोंचवून येतों. "
" कुठें ? "
" मुंबईला ! "
" मुंबईला—कुणाकडे ? "
" आमच्या गजाचं पत्र आलं आहे जरा निकडीचं ! इकडून गेल्यापासून सूनबाईची तब्यत बिघडल्यासारखीच झाली आहे. सारखा आजार लागला आहे मागें तिच्या हात धुवून ! आणि या आजाराने गजानन तर अगदीं त्रासून गेला आहे. हवापालट करावी असं डॉक्टरचं म्हणण—तूर्त घरात जेवणाखाण्याचे फारच हाल होतात म्हणून लिहिलं आहे त्याने. आईला लवकर पाठवून द्यावी आणि सौभाग्यवतीला आराम पडतांच तिला घेऊन जाण्याची व्यवस्था करावी, असं लिहितो तो आपल्या पत्रात ! तेव्हां म्हटलं घेऊन जावी हिला ! "
" सदुभाऊ, तुम्हाला काय वेड लागलं आहे ? तुमच्या गरजेच्या वेळीं लांब लांब व्याख्यानें देणारी हीच ना ती स्वारी—? "
" दामूअण्णा, कांहीं झालं तरी तो आमचा मुलगा आहे. चार दिवस कोणी कांहीं भरमसाट कल्पना डोक्यात भरवून दिल्या असतील आणि त्याच त्यानें पत्रांतून खरडल्या असतील ! तेवढयावरून आम्ही त्याच्यावर रागवूं लागलों तर कसं व्हावं ? "
" सदुभाऊ, तुम्हाला जायचंच असेल तर निदान आज न जाता आणखी दोन दिवसांनीं तरी जा !—आज मी त्याला एक पत्र लिहितों. तें एकदा त्याच्या हातांत पडूं दे ! मग आपण खुशाल जा ! " असे म्हणत म्हणत दामुअण्णांनीं तिथल्या तिथेंच दौत लेखणी घेऊन पत्र लिहिण्यास सुरवात केली.
" अनेक आशिर्वाद, "
" सदुभाऊंना पाठविलेलं तुझं पत्र त्यांना योग्य वेळीं मिळालें. पत्राचें उत्तर तेच पाठविणार होते, परंतु सध्यां त्यांची तब्यत जरा ठीक नसल्यामुळें त्यांच्या परवानगीनें मी हें उत्तर लिहित आहे.
पहिली गोष्ट म्हणजे तुझ्या आईला पाठविण्याविषयींची—मुलाचं लग्न होऊन त्यानं निराळा संसार थाटल्यावर आईचा आणि त्याचा लागाबांधा तुटतो हें एके काळीं तूं जोरजोरानें प्रतिपादित असलेलें मत इतक्या लवकर विसरलास याचें आश्चर्य वाटतें ! शिवाय तुझ्या आईचा तुला आतां काय उपयोग होणार ? आईची मुलावरील माया स्वार्थी असते ना ? मग अशा अडचणींत

तुझ्याकडे येऊन तुमच्या खस्ता खाण्यांत तिचा कांहीं स्वार्थ साधण्याचा संभव आहे का ?

दुसरी गोष्ट, तुझ्या पत्नीच्या आजारामुळें तुझ्या इच्छेच्या विरुद्ध तुला जें जुलमाचे ब्रम्हचर्य पाळावें लागले असेल आणि या अनैसर्गिक गोष्टीमुळें तुझी जी शारिरिक व मानसिक हानि झाली असेल त्याची आम्हांला कल्पनाहि करवत नाहीं. मग सौभाग्यवतीला इकडे पाठवून हा ब्रम्हचर्याचा अगर संशयाचा काल अधिक वाढविण्यापासून लाभ तो काय ? आतां यावर आपल्या नव्या नीतीचें नवीन तत्त्व जे व्यभिचारस्वातंत्र्य, त्याच्या उपयुक्ततेवर एक लांबलचक व्याख्यान झाडशील तर गोष्ट अलाहिदा । तात्पर्य, या सार्‍या गोष्टी ध्यानांत घेतां सदुभाऊंनीं तुझ्या म्हणण्याप्रमाणें वागणें म्हणजे सर्वच बाजूंनीं तुझ्या नव्या नीतीची गळचेपी करणे असें तुला नाहीं का ? वाटत ''

आपला,

**दामुअण्णा.**



## इन्दू

## ८

सूर्य डोक्यावर आला होता. ऊन तर अगदीं मी म्हणत होतें. पण मी ज्या ठिकाणी बसलो होतो तेथे आदित्यराजाला आपला हात शिरकवावयाला फारच कठीण जात होतें. सभोवार गगनचुंबित नारळीचीं झाडे पसरलेली असून आजूबाजूची जागा आम्रवृक्षांनीं व्यापून टाकलेली होती. अशाच एका आम्रवृक्षाखाली गणूची घोंगडी पसरून त्यावर अस्मादिकाची स्वारी अधिष्ठित झाली होती. आमच्या मालकीच्या जमिनींत नारळीची झाडे विपुल, आणि त्या जमिनीचे तुकडेही इतस्ततः पसरलेले, त्यामुळे आज मोठया सकाळीच उठून गणू व शिवा यांना घेऊन मी नारळ पाडून घेण्याच्या कामगिरीवर निघालो होतों. सकाळपासून उन्हातान्हातून फिरत असल्यामुळे मी अगदी थकून गेलो होतो. तहानही अतिशय लागली होती. माडाच्या शिखरावर विराजमान झालेल्या गणूला दोन कोंवळे नारळ ढकलून देण्याचे मी बसल्या जागेवरून फर्मान सोडलें. वारा जोराचा सुटला होता. माड जोरानें हेलकावे खात होता. आणि त्या माडाबरोबर गणूही झोके खात होता. त्रयस्थानें गणूच्या या धाडसाबद्दल तोंडात बोटच घातले असते. पण गणूला त्याचे काहीच वाटत नव्हतें. डाव्या हातानें माडाला घट्ट विळखा घालून उजव्या हातानें सपासप नारळ तोडण्याचा त्यानें झपाटा लाविला होता.

खेडयांतील तें जीवन किती रम्य आणि आल्हादकारक होतें ! त्या दिवसांची आठवण झाली कीं, अजूनही माझे हृदय आनंदाने भरून येते. नालगावात बहुतेक वस्ती म्हणजे शेतकऱ्याचीच. पांढरपेशाचीं घरे म्हणजे हाताच्या बोटावर मोजण्याजोगीं. आणि त्यातही आमचें घराणें म्हणजे ‘आंधळ्यात कान्होबा राजा’ या न्यायानें विशेष श्रीमंतात मोडत असे. त्यामुळे आणि विशेषतः आमच्या बाबांच्या उदार व उपकारी स्वभावामुळे त्या गांवचे आम्हीं अनभिषिक्त राजेच होतों असें म्हटले तरी फारसें गैर होणार नाही. आणि त्यातही पुनः युवराजपद माझ्याकडे आल्याकारणानें मला सारा गाव चांगलाच मान देत असे. माझ्या

आईला तर साऱ्या शेतकऱ्याबद्दल फारच कळकळ वाटत असे. त्यांच्या बाय-कात मिळूनमिसळून, त्यांचीं दुःखें समजावून घेऊन तीं निवारण्याचे शक्य ते प्रयत्न ती करीत असे. त्यामुळें परोक्ष किंवा अपरोक्ष रीतीनें जो तो तिला दुवाच देत असे. सहाच महिन्यापूर्वी जेव्हा तिनें आपली इहलोकींची यात्रा संपविली तेव्हा त्यावेळच्या देखाव्यावरून शेतकरी वर्गाला तिने कितपत आपलेंसे करून घेतलें होते त्याची कोणासही सहज कल्पना आली असती. आमच्या घरापुढील मोटे आगण शेतकऱ्यानीं चिक्कार भरून गेलें होतें. कित्येकजण परोपरीनें माझें सात्वन करण्यात गुग झाले होते, तर कित्येक डबडबल्या डोळ्यानीं बाबाकडे व माझ्याकडे पाहून सहानुभूतीने ओथबलेले उद्गार काढीत होते. आधींच त्याचा माझ्यावर लोभ फार. त्या दिवसापासून तर मी त्याच्या गळ्यातील ताईतच होऊन राहिलो.

कोवळ्या नारळाचे मधुर पाणी मनसोक्त ढासल्यावर पाडून झालेल्या नार-ळाची कशी काय व्यवस्था करावयाची ते गणूला सागून मी घराकडे मोर्चा वळविला. वाटेतच गणूचे घर—घर कसले, झोपडीच ती—लागत असे आणि दिवस कितीही वर आला असला तरी त्या झोपडीला पाय लावून गणूच्या म्हाताऱ्या बापाशी चारदोन इकडचे तिकडचे शब्द बोलल्याशिवाय मी कधींच घरी जात नसे. या माझ्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें आतांहि मी त्या झोपडींत शिरलो.

सोनबा—गणूचा बाप—काजूचे गर भाजण्यात गर्क होऊन गेला होता. आणि जवळच बसलेली त्याची सून भाजून झालेले गर फोडून ते एका पत्रावळी-वर साठवून ठेवीत होती. मला पाहताच सोनबाच्या सुनेनें उठून मला एक मोडकीशी फळी बसावयाला दिली, आणि आपण जवळच बाजूला उभी राहिली.

" झाले का सगळे नारळ पाडून ? " सोनबा हातातल्या काठीनें इतस्ततः पसरलेलीं जळकीं लाकडें एकीकडे करीत म्हणाला. " गणू तर म्हणत होता कीं, आजच्या दिवसांत कांहीं सगळे नारळ पाडून व्हावयाचे नाहींत म्हणून.".

" मलाही पण पहिल्यानं तसंच वाटलं होतं. " बाजूच्या ढिगांतले चार गर उचलून त्यातला एक एक तोंडात टाकीत मी म्हणालों. " पण तुझ्या गणबानं तर आज अगदीं मनावर घेतलेलं दिसत होतं. भारीच चपळ !

माडावर चढण्यात तर त्याच्याइतका पटाईत या नालगावात मला तर कोणी दिसत नाहीं. खारीसारखा सरसर केव्हा वर जातो नी केव्हा खालीं येतो ते कळतसुद्धां नाहीं. "

आपल्या नवऱ्याची ही स्तुति ऐकून सोनबाच्या सुनेचे मुख लज्जेनें किंचित् अवनत झालें. पण ह्या आपल्या चर्येवरचा भाव दृगोचर होऊं नये म्हणूनच कीं काय ती तोंड वळवून आजूबाजूला पडलेल्या गरांच्या साली केरसुणीनें गोळा करूं लागली.

" कांहीं म्हणा, धनीसाहेब, " सोनबा हातातले काम थोडा वेळ बंद ठेवून माझ्याजवळ येऊन म्हणाला. " दिवस मोठे कठीण येत चालले आहेत. माणसाची बुद्धि जोंपर्यंत फिरली नाहीं तोंपर्यंत सर्व काहीं ठीक चाललेलं असतं. पण तीच का एकदा फिरली म्हणजे काय होईल आणि काय नाहीं त्याचा काहीं नेम नाहीं. "

सोनबा वयानें बराच वृद्ध असल्यामुळें बोलण्यात मधून मधून सुभाषितें पेरण्याची त्याला संवय होती. आणि तीं सुभाषिते जरी त्याच्या त्या खेडवळ भाषेंतून व्यक्त होत असत तरी त्याना अनुभवाची जोड मिळाल्यामुळें त्याचा श्रोत्यांच्या मनावर चटकन् परिणाम होत असे. पण सोनबाचे हे बोल नेहमींच माझ्या कानीं पडत असल्यामुळें मी मात्र या गोष्टीला अपवाद होऊन राहिलो होतों. आतांही मी त्याकडे फारसें लक्ष दिले नाहीं.

" तुमचंच पाहा ना आता, " सोनबाने बोलणे चालू केले, " थोरले धनीसाहेब म्हणजे किती लाख माणूस ! आम्हीं तर त्याना आमचे अन्नदातेच समजतों—पण आता मात्र आमच्या गांवावर नारायणाचा कोप झाल्यासारखा दिसतो. नाहींतर त्याची बुद्धि अशी फिरली नसती. " इतके बोलून काहींशा चमत्कारिक मुद्रेनें तो माझ्याकडे पाहूं लागला.

बाबाचें नाव निघाल्यामुळें मी सोनबाचें बोलणें जरा लक्ष देऊन ऐकत होतों. त्याच्या तोंडून शेवटचें वाक्य बाहेर पडताच मी जरा गोंधळल्यासारखा झालों.

" काय म्हणतोस, सोनबा ? बाबांची बुद्धि फिरली ? म्हणजे केलं काय बाबांनीं ? खंडाचा भावबिव तर नाहीं ना वाढविला ? कीं तुमच्या मजुरीचे दर कमी केले ? मला तर बुवा यांतलं कांहींच माहीत नाही. "

" तशातला काहीं प्रकार नाहीं, धनीसाहेब." सोनबा किंचित् अडखळत म्हणाला, " तसं काहीं असतं तर आम्हाला त्याचं एवढं वाईट वाटलं नसतं— पण ती तुक्याची सखू तुमच्याकडे कामास आहे ना ? ती म्हणत होती कीं, आईसाहेबाना जाऊन पुरते सहा महिनेही झाले नाहींत तोच धनीसाहेब दुसऱ्या लग्नाच्या खटपटीला लागले आहेत म्हणून ! देव करो आणि ही दुष्ट बातमी खोटी ठरो ! "

" साफ खोटी गोष्ट ! असं होणं शक्य तरी आहे काय ? " मी मनाला विचारलें. " सोनबा, " मी त्याला धीर देत म्हणालों. " ही बातमी साफ निराधार आहे. अरे, आमच्या बाबाचा स्वभाव का तुला माहीत नाहीं ? आई-वर तर त्याचं निस्सीम प्रेम होतं. तुला खोटं वाटेल सोनबा, पण अजूनही कित्ये-कदा ते स्वस्थ बसले असता आईच्या आठवणीनं त्याचे डोळे भरून आलेले मी अनेकवार पाहिलेले आहेत. "

" तसं नव्हे धनीसाहेब, आम्ही काय जाणत नाहीं त्यांची आईसाहेबांवर केवढी माया होती ती !—पण म्हटल आपली बोलाफुलाला गाठ पडली आणि तसच काहीं घडून आलं तर तुम्ही अगोदर आम्हां सगळ्यांना अंतरणार ह्याचंच वाईट वाटतं. "

सोनबाची समजूत घालून मी त्याचा निरोप घेतला. पण वाटेंत त्याचें बोलणें सारखें माझ्या मनात घुमूं लागलें. अनिष्ट बातमी सहसा खोटी ठरत नसते म्हणतात. या न्यायानें सोनबाची बातमी खरीच ठरली तर ! मी मोठ्या ऐटीनें खूप अवसान आणून सोनबाची समजूत घातली खरी, पण आता माझ्या मनाची समजूत मात्र मला काहीं केल्या घालतां येईना. थोडयाच दिवसांपूर्वी गावांतील काहीं उपद्व्यापी लोकांनीं बाबाच्या मागें दुसऱ्या लग्नाचें टुमणें लावलें असल्याचें माझ्या कानीं आलें होतें. पण त्यावेळीं बाबानीं तसे कांहीं केल्यास त्या घरांत मी पळभरही पाऊल ठेवणार नाहीं अशी माझी भीष्म—प्रतिज्ञा मी बाबाच्या कानांवर अप्रत्यक्ष रीतीनें घातली होती. आणि मी बोलल्याप्रमाणें केल्याशिवाय खास राहाणार नाहीं अशी त्यांची पक्की खात्री असल्यामुळें म्हणा किंवा त्याचें माझ्या आईवर निरतिशय प्रेम असल्यामुळें म्हणा ( मला तरी त्या वेळीं दुसरेंच कारण खरें वाटलें ) त्यांनीं या उपद्व्यापी मंडळीच्या तोंडाना चांगलींच पानें पुसलीं. हा अनुभव अगदीं ताजा असल्यामुळें बाबांविषयीं मी पूर्ण निर्धास्त होतों. पण

आज सोनबानें सांगितलेल्या बातमीनें माझ्या मनात पुनरपि खळबळ उडवून सोडली. हें खरें असेल काय ? हाच एक प्रश्न मला सतावून सोडूं लागला. खरें असल्यास जी गोष्ट सखू मोलकरणीच्या कानापर्यंत गेली त्या गोष्टीचा मला मात्र मुळीच सुगावा लागूं नये हें आश्चर्यकारकच नाही का ? खास इथें काही तरी घोंटाळा झाला असावा. ध चा मा करून सखूने भलतीच बातमी सोनबाच्या कानांवर घातली असावी असें माझ्या मनाचे मी तात्पुरते समाधान करून घेतलें.

पण मला फार दिवस संशयांत राहावें लागले नाहीं. सोनबाची बातमी दुर्दैवानें खरी ठरली. एवढया उतार वयातही बाबावर मुलीच्या–अर्थात् मुलींच्या बापाच्या–उड्या पडूं लागल्या. मला बाबाचा खरोखरीच फार राग आला.

मृत्यु सभोंवार हैदोस घालीत असता आपण तेवढे त्याच्या तडाख्यातून सही-सलामत निसटून जाऊं असे प्रत्येक मानवी प्राण्याला वाटणे हा जगातील अनेक चमत्कारापैकीं एक चमत्कार होय असे धर्मराजाने सांगितल्याचे महाभारतात नमूद आहे. पण या विसाव्या शतकात, ‘ अंगं गलितं पलित मुंड ’ अशा अनेक वयोवृद्धांची दोनदोन तीनतीन लग्ने होत असलेली उघड्या डोळ्यांनी पाहत असतां प्रत्येक मातृपितृनिष्ठ तरुणाला मात्र आपले वडील तेवढे या नियमाला अपवाद आहेत किंवा असावेत असे वाटणे हाही एक चमत्कारच नव्हे का ? ते काही असो. पण माझी मात्र आतापर्यंत अशीच दृढ भावना होती की, बाबा काहीं केल्या दुसऱ्या लग्नाच्या विचाराला मनात मुळीच थारा देणार नाहींत. पण या माझ्या भावनेला बाबानीं आपल्या अलिकडच्या वर्तनाने एकदम जोराचा धक्का दिला. त्या वेळेपासून बाबाविषयीं माझ्या मनात अप्रीति उत्पन्न होण्यास सुरवात झाली. का होऊं नये ? आईच्या प्रेमाचा हा विश्वासघात आणि तोहि तिची स्मृति अगदीं ताजी असताना झालेला पाहून माझ्या पायाची तिडीक कपाळाला का जाणार नाही ? खरेच का बाबाना आईचा इतक्या लवकर विसर पडला ? बाबा, खरेच का हो तुम्ही इतके निष्ठुर झाला ?–लोक तुम्हांला काय म्हणतील ? आईची ती प्रशांत व प्रेमळ मूर्ति मला सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट दिसूं लागली. माझी मातृभक्ति कसाला लागण्याचीच ही वेळ होती. बस्स ! काही झालें तरी बाबाना या कृत्यापासून परावृत्त करावयाचें आणि आईचें तें पवित्रस्थान दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीकडून विटाळलें जाणार नाहीं. अशी खबरदारी घ्यावयाची असा मी आपल्या मनाशी निश्चय केला.

बाबाविषयीं माझ्या मनात निरतिशय आदर वसत होता. आणि या आदरामुळेच माझें त्याच्यावर अत्यंत प्रेम असताही आमच्या मध्यें एक प्रकारचा भिडस्तपणाचा पडदा पडत आला होता. अर्थात् साध्यासुध्या गोष्टीही मनमोकळेपणानें बोलण्याची जेथें मुष्कील, त्या ठिकाणीं बाबाच्या लग्नासारख्या नाजूक विषयावर त्याच्याशीं बोलणे मला अशक्यच होतें. त्यांना जें काहीं मला सागावयाचे होते ते लिहून कळविल्याशिवाय गत्यंतरच नव्हते. म्हणून एके दिवशीं बाबाचा तालमेळ पाहून मी कारुण्याने ओथंबलेलें, आईची पवित्र आठवण करून देणारे आणि लग्नाचा विचार कायमचा मनातून काढून टाकण्याबद्दल परोपरीनें आळविणारे असे एक विस्तृत पत्र लिहून ते त्याच्याकडे रवाना केले. आणि इतकेही करून जर लग्नाचा बेत कायमच झाला तर यापुढे एक पळभरही या घरात मी पाऊल ठेवणार नाहीं अशी निर्वाणीची धमकीवजा नोटीसही देण्यास मी कमी केले नाहीं.

पण हा माझा बाण फुकट गेला. बाबा अगदीं हट्टाला पेटल्यासारखेच दिसले. आजपर्यंत कधी न ऐकलेली भाषा बाबाच्या तोंडून ऐकूं येऊं लागली. "लहान तोंडी मोठा घास घेण्याचे सोडून द्यावे. मी करीत असलेली गोष्ट पूर्ण विचारांतीच ठरविलेली असल्यामुळे त्यात ढवळाढवळ करण्याचे कारण नाहीं." एवढाच जबाब बाबाकडून मला मिळाला. मला खरोखर फार वाईट वाटलें. व्हॉइसरॉयाना महात्मा गांधींनीं पाठविलेल्या लांबलचक पत्राला टीचभर उत्तर आलेलें पाहून महात्माजीनीं जे उद्गार काढले त्याची मला यावेळी आठवण झाली. बाबाकडून पुत्रप्रेमाच्या भाकरीची अपेक्षा करीत होतो; पण त्यानी माझ्या हातीं निर्दयतेचा दगड मात्र दिला. माझ्यापेक्षाही त्याना आपल्या लग्नाचा ओढा अधिक वाटला. माझी इतक्या दिवसाची पितृभक्ति आज निष्फळच ठरली. मी या घरातून कायमचा निघून गेलो तरी त्याचे बाबाना काहींच वाटूं नये ना ? केवळ लग्नापायी त्यानीं आपलें मन माझ्याविषयी इतकें कठोर करावे ना ? डोक्यात असंख्य विचार थैमान घालूं लागले आणि जगाच्या दृष्टीने जरी नसलें तरी स्वतःच्या दृष्टीनें तरी मी आज खरोखरच पोरका झालों असे वाटून माझे डोळे अश्रूंनीं भरून आले.

मुलींच्या शोधाला जरी बाबांची मित्रमंडळी एव्हापासूनच जारीनें लागली होती, तरी खुद्द बाबांचा विचार आणखी सहा महिने तरी लग्न करण्याचा नव्हता.

असें मला खात्रीपूर्वक कळलें होतें. पण आज काय किंवा आणखी सहा महि न्यांनीं काय, बाबा आपल्या म्हणण्याप्रमाणे केल्याशिवाय खास राहणार नाहींत ही पक्की खात्री होती. अशा स्थितींत यापुढें एक क्षणही या घरांत राहण्यात कांहीं शोभा नाहीं हें मला कळून चुकलें. ताबडतोब घराला आणि घराबरोबर नालगावालाही रामराम ठोकण्याचे मी ठरविलें. मात्र माझ्या बेताचा सुगावा कोणालाही न लागूं देण्याची मी खबरदारी घेतली होती. कारण नालगांवातील साऱ्या मंडळीचा—विशेषतः शेतकरी लोकाचा माझ्यावर अतिशय लोभ असल्यामुळें माझ्या बेतात त्यानी अनेक अडथळे आणले असते आणि त्याच्या त्या निष्कपट प्रेमळ हृदयाच्या हाकेकडे कानाडोळा करणें मलाही जड गेले असतें.

दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहाटेस कोणालाहि न कळवितां अत्यंत जड हृदयाने आणि तितक्याच जड पावलानी मी घरातून बाहेर पडलो. त्या वेळच्या माझ्या मनःस्थितीचे वर्णन करणे हे आकाशाची लांबी रुंदी मोजण्याच्या उपद्व्यापाइतकेंच अशक्य कोटींतले होते.



मुंबईत ताडदेवच्या बाजूला एका चाळींत लहानशी खोली घेऊन मी राहूं लागलों. याच्यापूर्वी मी मुंबईत फक्त एकदाच आलों होतों. तो म्हणजे मॅट्रीकच्या परीक्षेस बसण्यासाठीं म्हणून! त्यामुळे पहिल्या पहिल्याने चाळीतील जीवन मला अगदींच असह्य वाटूं लागलें. अफाट समुद्रात स्वैर विहार करणाऱ्या माशाला टीचभर पाण्याच्या लहानशा बाटलीत कोंडून ठेवावे त्याप्रमाणे माझी स्थिति झाली. नालगावांत ज्या स्वतंत्रतेचा मी उपभोग घेत होतो त्याच्या एकशतांश हिश्शानेंही मला इकडे स्वतंत्रता मिळत नव्हती.

नालगांवांत मला केवढा मान! जो तो मला अगदी तळहातावरच्या फोडाप्रमाणें वागवीत असे. सहज कोठें डोकें दुखावयाला लागले तर समाचारासाठी म्हणून लोकांची ही गर्दी होत असे. उलटपक्षीं मुंबईतील चाळींतील वस्ती म्हणजे सदर्न मराठा रेल्वेच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्यातून केलेला प्रवास! एकाच मजल्यावर अठरापगड जातीची बिऱ्हाडे. जो तो आपल्याच कामांत चूर! शेजारच्या खोलींत काय चालले आहे त्याची दाद एकमेकाला लागण्याची मारामार! मी राहत होतों त्या मजल्यावर एक नीळकंठरावाचें बिऱ्हाड सोडलें तर

आपले असें दुसरें बिऱ्हाड नव्हतें. अशा स्थितींत सुरवातीचे कांहीं दिवस मला अगदीं चुकल्या चुकल्यासारखें वाटूं लागल्यास त्यात नवल कोणतें ?

पण सरावाने कोणती गोष्ट आंगवळणीं पडत नाहीं ? दीडशें वर्षांच्या गुलामगिरीनंतरही स्वातंत्र्याची तीव्र लालसा मनांत उत्पन्न न होणें, किंवा नाटकात स्त्रियांनीं केलेल्या स्त्रियाच्या कामापेक्षां पुरुषानीं केलेलीं स्त्रियाची कामें अनैसर्गिक असूनही अधिक पसंत पडणे हा सर्व प्रभाव संवयीचाच नाहीं का ? मग काही दिवसानीं या नवीन जीवनाशीं मी समरस होऊन गेल्यास व त्यातच हळू हळू मला गोडी वाटू लागल्यास त्यात आश्चर्य करण्यासारखे काहीच नाहीं.

नीळकंठरावाची आणि माझी आता चांगलीच गट्टी जमली होती. त्यांच्याच ओळखीने मी एका डेअरी कपनींत नोकरीला लागलो होतो. त्यांच्या घरात इनमिन सारी तीन माणसे. ते, त्यांची पत्नी–यांना मी मामी म्हणत असें-आणि शिक्षणासाठी म्हणून त्याच्याकडे येऊन राहिलेली त्याची भाची—इंदू. या सर्वांशीं माझा चागलाच परिचय झाला होता. मला तीं आपल्यातीलच एक या नात्यानें वागवीत असत. माझ्या पूर्वेतिहासाबद्दल मात्र मी कोणालाच आतापर्यंत दाद लागू दिली नव्हती. शिवाय बाबानीं माझ्या शोधास सुरवात केल्यास त्याना सहजासहजी माझा पत्ता लागू नये म्हणून मी नामातरदेखील केले होते.

रविवारचा दिवस. दुपारच्या प्रहरीं मी माझ्या खोलीत कुठल्याशा कविमंडळाने प्रसिद्ध केलेल्या काव्यसग्रहावरील एका मासिकांतून आलेली खरमरीत टीका वाचीत पडलो होतो. इतक्यात शेजारच्या खोलींतून आलेले सतारीचे मधुर बोल माझ्या कानी पडले. नीळकंठराव सतार वाजविण्यात तरबेज होते. त्याच्या या कलेचा फायदा आतापर्यंत बऱ्याच जणांनीं घेतलाही होता. आणि अलीकडे मीहि त्यात थोडेंबहुत लक्ष घालूं लागलो होतों. त्यामुळे सतारीचा आवाज कानीं पडतांच हातांतील पुस्तक तसेच गफलतीनें फेंकून देऊन नीळकंठरावांकडे सतार ऐकण्यासाठी म्हणून गेलो. पण मौज ही कीं, नीळकंठराव कांही घरीं नव्हते. मामी नळावर गेल्या होत्या आणि ऐटींत एकावर एक पाय ठेवून आपलीं नाजूक बोटें सतारीच्या तारेवरून फिरविण्यात इंदुमतीबाईसाहेब दंग होऊन गेल्या होत्या. मी दारांतच थबकलों. इंदू सतार वाजवावयाला थोडीबहुत शिकली होती हें मला माहीत होतें. पण तिनें ती कला इतकी आत्मसात् करून घेतली असेल अशी माझी हा वेळपर्यंत कल्पनाच नव्हती.

क्षणभरानें मीं किंचित् खाकरल्यासारखें केले. इंदूनें माझ्याकडे पाहिलें आणि लाजल्यासारखे करून सतार खाली ठेवली. " एकूण आम्ही इकडे येऊं नये अशीच तुझी इच्छा दिसते, इंदू. ठीक आहे ! चाललो मी." असे म्हणून परत फिरण्याचा खोटाच आविर्भाव मीं आणला.

" इश्श ! भलतीच काहीं तरी मनाची समजूत करून घ्यायची म्हणजे काय बाई ! उगीच म्हटलं वेडीवाकडी सतार वाजवून दुसऱ्याना कटकट कशाला करा, म्हणून मी—"

" अस्सं अस्सं ! त्यापेक्षा गाढवाला गुळाची चव काय कळणार अस्सं वाटून सतार खालीं ठेवली असे स्पष्टच कां म्हणेनास ? "

" पाहा हो, आपणच आपल्याला काहींतरी संबोधून घ्यायचं अन् मग दुसऱ्यावर रागवायचं ही कला चांगली साधलीय् तुम्हाला. " इदू हंसत हसत म्हणाली.

" अन्–इंदू " तिचें बोलणें ऐकलं न ऐकलेसे करून मी पुढें म्हणालो. " कालच ना तूं म्हणाली होतीस कीं तुमचं नि माझ पूर्वजन्मीचं काहीं तरी नातं असावं असं मला अलीकडे वाटूं लागलंय् म्हणून ! आणि आज मात्र मी तुला दुसरा आणि तिसरा वाटूं लागलो ना ? कालचा पुनर्जन्मावरील विश्वास आज अगदीं मावळून गेला वाटतं ? स्त्रियाचा स्वभाव चंचल असतो म्हणतात तें उगीच नाहीं. "

या माझ्या सरबत्तीने इंदू गोंधळून गेली. काय बोलावें तेच तिला कळेना. आपला अपराध तो काय आणि त्याच्यासाठीं राईचा पर्वत करावयाचा तो काय अशा मुद्रेनें ती माझ्याकडे पाहूं लागली. तिच्या डोळ्यात मूर्तिमंत करुणा दिसत होती. जणूं काय "मी चुकले. क्षमा करा." असेच तिचे नेत्र मला सागत होते. माझा लटका राग कोणीकडच्या कोणीकडेच गेला. इंदू माझी असती तर या वेळीं मीं तिची निराळ्याच रीतीनें समजूत घातली असती. पण आज तिच्यावर माझा हक्क नव्हता. आता अधिक ताणल्यानें तुटेल म्हणून मी हलकेच खालची सतार उचलून हंसत हंसत तिच्या हातांत दिली.

" आतां परत कधीं रागावणार ? " पूर्वीच्याच दृष्टीनें माझ्याकडे पाहात इंदूने विचारलें.

" भले ! म्हणजे मी असा कारणाशिवाय नेहमीं नेहमीं रागावतों वाटतें ? "

" नाहीं तर काय ? " अशा अर्थानें इंदूने मानेला हिसडा दिला आणि ती सतार वाजवूं लागली. सतारीच्या तारा हलक्या हाताने इंदू छेडीत होती. तितक्याच हळुवारपणे माझ्या हृदयाच्या ताराही त्याच वेळीं छेडल्या जात होत्या.

आमचे हे सतारवादन चालू असताच मामी टॉवेलाला हात पुशीत पुशीत तेथे येऊन थडकल्या. त्यांच्या मुद्रेवरून त्या कसले तरी कोडे सोडविण्याच्या उद्योगात असाव्यात असे दिसले.

" वसंतराव, " मामींनी सुरवात केली. " आज बरेच दिवस तुम्हांला काही विचारीन विचारीन म्हणते पण बाई राग बिग आला तर तुम्हाला ! "

" हो, " मी थट्टेच्या स्वरानें म्हणालों. " भाचीनें तर आताच आम्हांला " रागीट " म्हणून शेरा दिलेलाच आहे. आतां मामींचीच पाळी काय राहिली होती तसं म्हणायची. "

" तसं नव्हे हो वसंतराव. पण आपलं—"

" हं, विचारा बघूं काय ते ! होऊन जाऊं द्या, एक घाव नि दोन तुकडे " मी मामींना पुढे बोलावयालाच अवसर न देता म्हणालो.

" मी विचारणार ते तोडण्यासाठी नव्हे, जोडण्यासाठीं बरं का, वसंतराव. मला तुमचं गोत्र काय तेवढंच विचारावयाचं आहे तुम्हाला. " मामींनीं फोड फोडला.

" एवढच ना ? माझं गोत्र कौशिक. " मामींचा अंतर्गत हेतु न कळल्याचें सोंग आणून मी म्हणालो.

"खरंच का ? मग आमच्या इंदूच्या गोत्राला जुळण्यासारखंच आहे म्हणायचं तुमचं गोत्र ! लिहायला हवं इंदूच्या वडिलांना. " मामीने माझ्याकडे पाहात म्हटले.

काय हे मामीचे बोलणें ! सगळें आपलें उघड उघड ! मी चटकन् इंदूकडे पाहिलें. तिनेंही अगदीं त्याच वेळी वांकड्या नजरेनें माझ्याकडे पाहिले. जणूं काय मामींनी आमच्या दोघांच्या मनातील भाव अचुक कसा ओळखला अशाच अर्थाचें तें आमचें पाहणें होते.

" तुझं आपलं भलतंच, काहीं तरी, मामी ! " इंदू लटक्या रागानें मान वेळून म्हणाली.

" काय झालं ग यात भलतंच, इंदू ?" इंदूच्या मनातील भाव ओळखून मामींनीं विचारलें.

" भलतंच नाहीं तर काय, मामी ?" मी इंदूला चिडविण्याचे उद्देशानें म्हणालों. " तुमची इंदू म्हणजे कशी नक्षत्रासारखी मुलगी आहे अगदीं ! आणि अशा या मुलीची माझ्यासारख्या चार रुपडे मिळविणाऱ्या जन्मदरिद्र्याशी—"

अरे बापरे ! काय ते इन्दूनें डोळे फिरविले गरकन् ! एक एक डोळा एवढाला करून ती माझ्याकडे पाहूं लागली. त्या रागासरशीं तिनें हातातली सतार खालीं आपटली आणि झटक्यानें उठून ती बाहेर ग्यालरींत जाऊन उभी राहिली. त्या वेळचा तिचा एकंदर अविर्भाव मला अत्यंत रमणीय असाच वाटला.

आली पुनः पंचाईत ! आता हा राग कसा घालवावा ? मामी केव्हा एकदा आत जाते त्याचीच वाट पाहात होतो. ती आत जाताच मी हळूच ग्यालरींत गेलो.

" इंदू, आतां परत कधीं रागवायचं म्हणून कुठचं तोंड विचारीत होते ते मघाशीं ? आता कोण रागावलं ? तूं कीं मी ?"

" छान ! आपणच आधीं राग येण्यासारखं काहीं तरी बोलायचं आणखी राग आल्यावर मग—" नीळकंठरावाना येताना पाहून इन्दूने आपलें बोलणें अर्ध्यावरच थांबविलें.

त्या रात्रीं मला सुखस्वप्नावर सुखस्वप्नें पडत होतीं. दुपारचें ते मामींचें बोलणें, इन्दूचे बाह्यात्कारी रागावणें आणि सूचक अर्थानें माझ्याकडे मधून मधून दृष्टिक्षेप करणें, इत्यादि मधुर प्रसंग चलच्चित्रपटाप्रमाणें एकामागून एक माझ्या डोळ्यांसमोरून जाऊं लागले. इन्दूच्या सहवासात आपलें आयुष्य किती सुखांत आणि मजेत जाईल ! हा एकच सुखदायक विचार राहून राहून माझें मन उत्तेजित करीत होता. पण इंदू माझी झाली तर तिला पूर्णपणें सुखांत ठेवायला मी समर्थ आहे का ? तिच्या हौशी माझ्याकडून फेडल्या जातील का ? माझ्या सांप्रतच्या परिस्थितींत तर इंदूचे लाड पुरविणे मला अशक्य दिसत होते. ती कोणत्याही गोष्टीचा आग्रह धरणारी मुलगी नव्हती. मिळेल ती मिठभाकर खाऊन सुखानें संसार करण्याची कलाही तिच्याकडे होती, हें मला तिच्या निकट सहवासामुळें कळून चुकलें होतें. पण तिनें तशा स्थितींत दिवस काढलेले मला कसें पाहवणार ? माझें मन आतां घरी ओढ घेऊं लागलें. तिला घेऊन

नालगावाला गेलों तर !–तर सर्व लोक आपली छिः थूः करतील. केवळ एका मुलीच्या प्रेमपाशांत अडकल्यामुळें मीं माझ्या स्वाभिमानावर पाणी सोडले असेंच सर्वजण समजतील, आणि मीं त्याच्या मर्जीतून तात्काळ उतरून जाईन हें मला सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट दिसूं लागलें. अवघ्या सहा महिन्यात केवळ इन्दूमुळें माझ्या मनांतील हा पालट पाहून माझी मलाच लाज वाटली.

पण इंदूविषयींचे माझे वेड मात्र मुळीच कमी झालें नाहीं. उलट दिवसें-दिवस शुक्लेंदूप्रमाणे ते वृद्धिंगतच होत होते.

त्या दिवशीं काय झाले कोणास ठाऊक, पण इंदू सबंध दिवसात एक शब्दही माझ्याशी बोलली नाहीं. इतकेंच काय, पण होता होईल तो ती मला टाळण्याचा प्रयत्न करीत होती. असेल नेहमीप्रमाणेंच लुटुपुटूचा राग म्हणून पहिल्याने मीं तिकडे दुर्लक्षच केले.––पण मग नीळकंठराव व मामी यादेखील आज गप्प का ? नेहमीप्रमाणे ती माझ्याजवळ मुळींच बोलली नाहींत. त्याच्या मुद्रेवर कसल्या तरी चिंतेची, निराशेची छाया दृग्गोचर होत होती. कोणाला विचारावे आणि काय विचारावे तेच मला समजेना. शेवटीं एकदा मनाचा हिय्या करून मामी एकटया सापडताच त्याना त्याच्या दुःखाचें कारण विचारलें. मामी पहिल्याने अळटळं करून उडवाउडवीचीं उत्तरे देत होत्या; पण मीं अगदींच त्याचा पाठपुरावा केल्यामुळे त्यांना सर्व काही सागणे भाग पडलें.

मामी, मामी, काय सांगितलेत हे ? याच्यापेक्षा—पण छे, विचार करण्या—इतकेंही माझे डोकें ठिकाणावर नव्हते. मी कसाबसा एकदाचा माझ्या खोलींत आलों आणि धाडकन् बिछान्यावर पडलों.

माझा सारा व्यूह कोसळून पडला. मनातले मांडे मनांतच जिरले. इन्दूला काहींसुद्धा न कळविता तिच्या वडिलांनी तिचें लग्न ठरविलें यांत आश्चर्य मानण्यासारखे काहींच नव्हतें. सबंध आयुष्याची धूळधाण करणारी ही निर्दय चाल आपल्या समाजांत आज बरीच वर्षे बोकाळात राहिली आहे. ती ज्या दिवशीं नष्ट होईल तो सुदिन ! पण मामींच्या बोलण्यावरून इंदूचे वडील तरी या नियमाला अपवाद असतील अशी माझी कल्पना होती आणि म्हणूनच नीळकंठरावाची आणि मामींची संमति मिळतांच इंदूच्या वडिलांचा रुकार हा ठरलेलाच. असे मानून मीं मनात कल्पनेचे मनोरे बांधले होते.

आतां पुढे काय ? हा विचार माझ्या मनाला सारखा त्रास देऊं लागला. मी अगदीं अस्वस्थ झालों. कशावरही आज माझें चित्त लागेना. इंदूचें लग्न

ठरलें. ती उद्या येथून जाणार ! हीं दोन वाक्ये राहून राहून मला भेडसावीत होती—माझें जीवन मला अगदीं असह्य करीत होतीं. तीं मनातून काढून टाकण्याचा मी आटोकाट प्रयत्न केला; पण व्यर्थ !

खोलीचें दार वाजलें म्हणून मी सहज तिकडे पाहिलें. दरवाजात इंदू उभी होती. मी मानेनें खुणावतांच ती आत आली. तिचे डोळे रडून रडून सुजल्या-सारखे दिसत होते, तोंड साफ उतरून गेलें होते आणि सबंध दिवसांत केसात फणी कशी ती घातली नसावी असे तिच्या अस्ताव्यस्त केशसंभाराकडे पाहातांच चट्‌कन् लक्षात येत होतें.

बराच वेळपर्यंत ती माझ्याशीं किंवा मी तिच्याशीं चकार शब्दही बोललों नाहीं. काय, बोलणार तरी काय ? बोलण्यासारखे आता काहीच शिल्लक राहिलेले नव्हतें.

" आपला शेवटचा निरोप घ्यायला मी आलें आहे. " इंदू रडक्या स्वरांत म्हणाली.

" इंदू, नको ते कठोर शब्द मला ऐकवूंस ? इंदू, तूं माझ्यावर खरोखरीच प्रेम करीत होतीस का ? मला नाहीं वाटत ! " निराश होऊन मी म्हटलें.

माझा हा चमत्कारिक प्रश्न ऐकताच इंदूनें चमकून माझ्याकडे पाहिलें.

" इंदू, खरोखरच जर तुझं प्रेम माझ्यावर असतं तर—तर आज घरीं जाण्याच्या तयारीला लागण्याऐवजीं मर्जीविरुद्ध लग्नाला मी साफ उभी राहणार नाहीं असं निक्षून तूं आपल्या वडिलाना लिहून कळविलं असतंस ! " इंदूने एक लांबलचक सुस्कारा सोडला.

" अशा वेळीं माझ्या दुःखावर डागण्या देणं आपल्याला शोभतं ना ? इतक्या दिवसांच्या निकट सहवासानंतर अजूनही जर माझ्या प्रेमाबद्दल आपल्याला खात्री वाटत नाहीं तर मी तरी आणखी काय बोलणार ? आतां बाबाना लिहून कळविण्याबद्दल म्हणाल तर वृद्धापकाळीं त्याना केवळ माझ्यामुळ दुःख व्हावं हें मला बरं दिसत नाहीं. माझ्या सुखासाठी त्यांना त्रास व्हावा, हें माझ्या मनाला कसंसंच वाटतं. असो, ईश्वराच्याच मनातून जर आपल्या सुखांत असा बिब्बा घालायाचा होता तर त्याला कोण काय करणार ? "

मला या वेळीं त्या ईश्वराचा भारी राग आला. त्याच्या घरचा साराच न्याय असा उलटाच असतो कीं काय कोण जाणें !

इदू गेली, आणि तिच्याबरोबर माझा आनदही गेला. सारे जग मला अगदीं शून्य भासूं लागले ! गोडी म्हणून कशातच लागेना. नीळकंठरावाची खोली तर मी अलीकडे अगदीं वर्जच केली होती. कारण तिकडे जाताच साऱ्या जुन्या आठवणींची भुते मला भेडसावून सोडीत असत. दिवसामागून दिवस जात होते. अशाच एके दिवशी इंदूचे लग्न निर्विघ्नपणे पार पडल्याचे पत्र नीळकंठरावाना आलें. नीळकठराव लग्नाला गेले नव्हते. एक तर त्याना रजा मिळण्यासारखी नव्हती आणि दुसरे हा लग्नसबध इंदूच्या इच्छेविरुद्ध घडून येत असल्यामुळे त्याना बिलकूल पसत नव्हता.

कालातराने सर्व गोष्टींचा विसर पडतो म्हणतात. पण इंदूला जाऊन सहा महिने लोटले तरी तिची स्मृति अंशतःही नष्ट होण्याची बिलकूल चिन्हें दिसे-नात. इदू आता दुसऱ्याची झाली होती. तिच्याविषयींच्या पूर्वीच्या आपलेप-पणाचा नुसता विचारही मनांत आणणे हे आज पाप ठरत होते; म्हणून माझ्या स्मृतिपटलातून तिचें कायमचें उच्चाटण करण्याचा मी आटोकाट प्रयत्न करीत होतो. पूर्वीची जागा सोडून मी दुसरीकडे राहावयास गेलों आणि मनाला नेहमीं कसल्या ना कसल्या तरी उद्योगात गुतवून ठेवूं लागलो. हेतु हा की, इंदू म्हणून कोणी व्यक्ति होती आणि तिचा माझा परिचय होता ही गोष्ट मनातून अजिबात नष्ट व्हावी. पण इतकी खबरदारी घेतली असताही मला त्यात काडीमात्र यश आले नाही.



घर सोडल्यास मला आता जवळ जवळ दीड वर्ष होत आले होतें. एवढ्या अवधींत नालगावची कांहींच खबर मला कळली नव्हती. मी गेल्यावर बाबाना वाईट वाटलें असेल काय ? त्यांनी माझ्या शोधासाठी खटपट केली असेल काय ? आपल्या लग्नाच्या बेताला त्यानीं तिलांजलि दिली असेल काय ? इत्यादि प्रश्नाची उत्तरें कळण्यास मी अगदीं आतुर होऊन गेलों होतों.

त्या दिवशीं संध्याकाळी नेहमींप्रमाणे फेरफटका करून मी येत होतों. मोठा रस्ता सोडून आडव्या गल्लींत शिरणार तोंच मागून "धनीसाहेब" अशी पूर्व-परिचित हांक माझ्या कानीं आली. मागें वळून पाहातों तों सोनबा ! मी चकितच झालों.

म्हातान्याला पाहून मला फार आनंद झाला. मुंबईस येण्याचे कारण विचारतांच तो खेदानें म्हणाला.

" काय सांगू धनीसाहेब, तुम्हीं गेलात नी नालगावची सारी शोभा गेली. तुमच्या वडिलानीं आपला लग्नाचा हट्ट शेवटीं पूर्णपणें तडीस नेला. तुमचा शोध करण्याविषयीं त्यांना आम्हीं परोपरीनें विनविलं पण त्यानीं तिकडे बिलकूल लक्ष दिलं नाहीं. उलट तुमचं नांवही कोणी तोंडावाटे काढता नये असं त्यानीं फर्मान सोडलं. घरींसुद्धां तुमचं नांव काढलेलं त्याना खपेनासं झालं. तुम्हीं निघून गेल्यामुळं साऱ्या गावांत आपली बेअब्रू झाली असं त्याच्या मनानं घेतलं असावं. आमच्या घरीं तर तुमचं विशेष येणं जाणं म्हणून आमच्यावर तर त्यांचा फार राग झाला. आमच्याकडे खंडाला असलेला जमिनीचा तुकडा त्यांनीं म्हादबाला देऊन टाकला. त्या तुकडयावर तर आमचा जीव जगला होता. तो गेला नी आम्ही उघडयावर पडलों. धनीसाहेबाना आज दया येईल, उद्यां दया येईल, म्हणून त्याची आम्ही सारखी विनवणी करीत होतों; पण देवच कोपला आणि—" इतके बोलून सोनबा थाबला.

" आणि काय झालं ? " मीं विचारलें.

" काय होणार ? धनीसाहेब तुम्हां आम्हां सर्वांना सोडून एकाएकीं देवाच्या घरीं गेले. "

" बाबा वारले ? " मी मटकन् खालीं बसलों. सभोवतालचें सारें जग जणूं गरगर फिरत असल्याचा मला भास झाला. म्हातान्याच्या मदतीने मी कशी-बशी एकदांची माझी खोली गाठली.

" धनीसाहेब गेले तेव्हां लोकानीं तुमचा पुष्कळ शोध केला. ताराचा आणि पत्रांचा तर नुसता पाऊस पडला. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. सध्यां तुमचा सगळा कारभार धनीसाहेबाच्या नव्या सासऱ्यांच्या हातीं आला आहे. त्याच्या-कडे कसली आमच्यासारख्या गरिबाची डाळ शिजते ? तेव्हा घेतला गणूला बरोबर आणि आलों इकडे. म्हटलं गिरणीबिरणींत लागली एखादी नोकरी तर लागली. "

सोनबा थोड्या वेळानें निघून गेला. तो जातांच आतांपर्यंत दाबून ठेवलेलं सारं दुःख आश्रूंवाटे आवेगानें बाहेर पडूं लागले. एखाद्या लहान मुलासारखा मी हुमसून हुमसून रडूं लागलों पण माझें सांत्वन करावयाला तेथें कोण होतें ?—

तेथेंच कशाला ? साऱ्या जगात तरी आता माझें कोण होतें ! संकटें कधीं एकटीं येत नसतात हेंच खरें !

दुःखाचा पहिला आवेग ओसरताच आतां या बदललेल्या परिस्थितींत माझें कर्तव्य कोणतें याचा मी विचार करूं लागलों. मुंबईंत राहण्यात आता कांहीं हंशील नाहीं. बाबा गेले त्याच्याबरोबर त्यांच्यावरचा रागरुसवाही गेला. आतां नालगांवीं जाऊन इस्टेटीची देखरेख पहावी आणि सावत्र आईच्या दुःखांत तिला शक्य तेवढें सुख देण्याचा प्रयत्न करावा हेंच काय तें माझें कर्तव्य !

एखादी गोष्ट मनात येण्याचाच काय तो अवकाश कीं, ती तावडतोब पार पाडलीच असा माझा स्वभाव होता. लगेच दुसऱ्या दिवशीं मुंबईतलें चंबूगवाळें आटोपून मी नालगांवास जाण्यास निघालों.



घरीं पोहोंचलों त्यावेळीं बरीच रात्र झाली होती. घराच्या पायऱ्या चढतांना नानाविध भावनानी माझे अंतःकरण उचंबळून येत होते. आत शिरताच उजव्या हाताला बाबाची बसण्याउठण्याची खोली लागली. त्या खोलीकडे येताच पाय जमिनीला खिळल्यासारखे झाले. पुढें पाऊल टाकण्याचे सामर्थ्य एकाएकीं माझ्या पायातून नष्ट झाल्याचा भास मला झाला. मनाला कसेंबसें एकदाचें आवरून मी पुढें गेलों. मिणमिण पेटणाऱ्या समईच्या अंधुक उजेडात एक मुलगीवजा बाई उभी होती. हीच आपली सावत्र आई असे समजून तिकडच्या रिवाजाप्रमाणे तिला नमस्कार करण्यासाठीं म्हणून पुढें गेलों. त्याचवेळीं तिची नजर माझ्याकडे गेली.

"कोण इंदू ?" आश्चर्यातिरेकानें इतकेच शब्द बोलून मी मटकन् खालीं बसलों.

हाय ! दैव माझ्या पाठीला पुरते हात धुवून लागलें होतें. निराशेनें तर जणूं काय माझा पिच्छाच पुरविला होता. या घरांत आतां मी कसा राहूं ? ज्या इंदूच्या सहवासापुढें मीं स्वर्गही तुच्छ मानला असता, त्याच इंदूच्या सहवासांत आता एक दिवसही घालविणे म्हणजे मला जिवावरले संकट वाटत होतें. ईश्वरानें इंदूला आतां इतक्या उच्च स्थानीं आणून बसविली होती कीं मनानेंसुद्धां तिला स्पर्श करणें म्हणजे पापाच्या खोल गर्तेत जाणून बुजून उडी टाकण्यासारखेंच होतें. तिच्याबद्दलची माझी आतांपर्यंतची भावना मला एकदम तडकाफडकी झुगारून

देतां येणें शक्य आहे का ? पूर्वीची भावना यापुढें चुकूनसुद्धा माझ्या मनाला स्पर्श करणार नाहीं असा मला आत्मविश्वास आहे का ? पुष्कळ विचार करूनही या सगळ्या प्रश्नांचें उत्तर मला नकारार्थीच मिळूं लागलें. मग पुढें काय ? याला एकच उपाय होता. एक तर इंदूनें हे घर सोडलें पाहिजे किंवा मला तरी इकडून काळें केलें पाहिजे. दुसरा इलाजच नाहीं. पण इंदूला हे घर सोडण्यास मी कोणत्या तोंडानें सांगूं ? तसे करणें म्हणजे तिच्या दुःखावर डागण्या देण्यासारखेंच होत नाहीं का ? माझ्या निष्ठुरपणाची ती तर कमालच म्हणावयाची ! राहता राहिला एकच मार्ग ! आलो तसाच मागल्या पावलीं परत जाण्याशिवाय मला गत्यंतरच नव्हतें. मी ताबडतोब उठलो आणि खालीं मान घालून बाहेर आलों. बाहेर गडद अंधार पडला होता. पण माझ्या अंतःकरणांतील दाट अंधाराच्या पासंगाला ही तो पुरणारा नव्हता. इकडे तिकडे न पाहातां त्या तशाच अंधारांतून मी झपाझप चालूं लागलों. एकेकाळीं मी होऊनच तें घर सोडून गेलों होतों. आज दैव मला माझ्या इच्छेविरुद्ध हात धरून त्या घरातून बाहेर काढीत होते.



## त्याची निवड!



अगदीं अखेरचें प्रिस्क्रिप्शन लिहून झाल्यावर डॉक्टर शरच्चंद्रानें एकदां सभोवार नजर फेकली. आणखी कोणी पेशंट राहिला नाहीं, अशी खात्री होताच तो उठला, अंगात कोट चढवित चढवितच त्यानें कंपाउन्डरला कांहीं सूचना देऊन ठेवल्या आणि बॅग घेऊन स्वारी दादर उतरूं लागली. आज दवाखान्यात गर्दी विशेष असल्यामुळे नेहमीपेक्षा अर्धा तास त्याला उशीर झाला होता.

तो जिन्याच्या पायऱ्या उतरून खालीं यावयाला आणि त्याचवेळीं एका मोटारींतून फॅशनेबल पोषाक केलेली एक सतरा-अठरा वर्षांची युवती खालीं उतरावयाला एकच गाठ पडली. शरच्चंद्राला ती अपरिचित असली, तरी तिनें मात्र त्याला ओळखले असावे असे तिच्या चर्येवरून दिसले.

" घरीं जायला निघालात वाटतं ?—तरी मी बाबाना म्हणतच होते, कीं डॉक्टरचा टाइम होऊन गेला असेल ! कशाला उगीच तसदी द्या त्याना ! पण छे, माझं ऐकतील तर बाबा कसले ते आमचे ! "

" कोण आजारी आहे ? " तिचे बोलणे थांबताच डॉक्टरनें विचारलें.

" आमच्या बाबाना जरा बरं वाटत नाही आहे दुपारपासून ! आणि आतां तापही आलाय् थोडासा. म्हटलं साधा ताप आहे, आताच कशाला डॉक्टरला आणायला हवं ? पण ते काही केल्या आपला हेका सोडायला कबूल होईनात ! आणि दुसरा कुणी गेला, तर तुम्ही कदाचित् यायची टाळाटाळ कराल म्हणून मलाच त्यानी मुद्दाम पाठवलं. "

" हें पाहा, तुम्ही उगाच आपल्या मनाला लावून घेत आहांत ! आमचा धंदाच असा आहे, की कुणी केव्हाहि बोलवायला आला, तरी त्याला नाहीं म्हणून म्हणायचं नाहीं ! चला, मी येतों तुमच्याबरोबर ! "

मोटर चालू होताच शरच्चंद्राने विचारले, " तुमच्या बाबाचं नाव काय ? "

" रावसाहेब कोठारे; तुम्हाला ऐकून माहित असतीलच. "

" रावसाहेब कोठारे ! "—शरच्चंद्राच्या तोंडून आश्चर्योद्गार निघाला ! त्याची आई अलीकडे त्याच्या फारच पाठीस लागली होती. एकदांचे दोन हातांचे चार हात लौकर करून घे, हा तिचा आग्रह ! अनेक थोरामोठ्याच्या मुली त्याला सांगून येत होत्या. आणि शरच्चंद्र घरी गेला, कीं रोज त्याच्यापुढें ती मुलींची नामावळ वाचीत असायची; पण त्यातल्या त्यांत तिचा विशेष भर म्हणजे रावसाहेब कोठारे यांच्या स्थळावरच होता. आणि आपल्या मुलाने हेंच स्थळ पसंत करावे अशी तिची इच्छा होती. या सर्व गोष्टीमुळे रावसाहेब कोठारे यांचे नाव ऐकताच त्याला आश्चर्य वाटणें साहजिकच होतें.

त्याच्या आश्चर्याचें कारण तिच्या ध्यानात आल्यावांचून राहिले नाही; तरी-पण आपण जणूं काय त्या गावचीच नाही, अशा अविर्भावाने तिनें विचारले, " कां, आश्चर्य वाटलं तुम्हाला एवढ ? "

" छे, उगाच ! "

" तरी पण !—मला समजूं नये इतकं खासगी आहे का ते ? "

" छे, छे, खासगी काय असायचं त्यात ? पण अगदीं काल-परवाच हे नाव आमच्या घरीं माझ्या ऐकण्यात आलं आणि लगेच आज त्याच्याकडे जाण्याचा प्रसंग आला या योगायोगाबद्दल जरा आश्चर्य वाटलं ! "

" बाबाचं नांव बहुतेक तुमच्या आईकडूनच तुमच्या कानावर आलं असेल, नाहीं ? " तिनें फटकळपणें विचारलें. त्यानें तिच्या चेहऱ्याकडे पाहिलें. ती मिस्कीलपणें हांसत होती. तो लाजल्यासारखा झाला.

मोटर घरीं पोहोचेपर्यंत शरच्चंद्रानें तिची नजर चुकवून दोनतीन वेळा तिच्या-कडे निरखून पाहिले. ती त्याला फारच मोहक आणि सुंदर दिसली !

शरच्चंद्रानें रावसाहेबांची प्रकृति तपासून पाहिली. आजाराचें सोंग होतें तें ! जरा कुठें सर्दी झाली असेल ! एकंदरींत हें कपटनाटक आपणासाठींच घडवून आणलेलें आहे हें शरच्चंद्राच्या ध्यानांत यावयाला वेळ लागला नाहीं.

" तुमचे वडील माझ्या चागल्याच परिचयाचे होते. " रावसाहेब हळूहळू मुद्यावर येऊं लागले. " आमच्याकडे त्यांचा फारच ओढा होता. ते वारले आणि त्यांचा व आमचा संबंध सुटला. आपण मनावर घेतल्यास हा तुटलेला संबंध सांधतां येण्यासारखा आहे. कां, आहे का विचार ? "

" खरं सांगायाचं, म्हणजे याबद्दल मीं अजून विचारच केलेला नाहीं. विचार करून मागाहून कळवीनच तुम्हाला ! "

" जरूर, जरूर ! कुठचीही गोष्ट विचाराशिवाय करणं म्हणजे—म्हणजे अविचारच तो ! तशात ही बाब म्हणजे अशी आहे, कीं काय विचारूं नका ! "

" मग कधीं पुढच्या आठवड्यात कळेल का आपला विचार ? "

" हां ! " असें म्हणून शरच्चंद्र उठला.

" काते ! " रावसाहेबांची हाक ऐकतांच बाजूलाच उभी असलेली कांता पुढें झाली. " डॉक्टर, ही माझी मुलगी तुम्ही आता पाहिलीतच ! तिच्या लावण्याची मी स्तुति केलीच पाहिजे असं नाहीं. मॅट्रिक पास झालेली आहे ती ! तुमची इच्छा असल्यास तिला कॉलेजात घालण्यास माझी मुळींच ना नाहीं. टेनिस तर इतकी सफाईदार खेळते, कीं काय विचारूं नका. चित्रं काढण्याचाही बराच शोक आहे तिला ! काते, तुझा स्टुडिओ दाखव याना ! "

" माफ करा, आतांच काय घाई आहे त्याची ? मग येईन एक दिवस मुद्दाम तुमचा स्टुडिओ पाहायला ! राग मानूं नका अं ! "

रावसाहेबांच्या तडाख्यांतून एकदाची कशीबशी सुटका करून घेऊन शरच्चंद्र घरीं आला. कपडे काढल्यावर नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें तो आपल्या आईच्या खोलींत गेला.

" काय आई, आज कोणकोणत्या मुली आल्या होत्या मला सांगून ? " त्यानें हंसत हंसत प्रश्न केला.

" कर बाबा थट्टा ! माझी थट्टा तूं नाहीं करणार तर कोण करणार ? तुला लग्न करायचं नसेल, तर नको करूं बापडा !—बरं, पण तुला आज एवढी रात्र कशी झाली रे ? "

" खरं सांगूं का, आई ?—आज मी मुलगी पाहायला गेलों होतों. "

" हो, तूं मुलगी पाहायला जाणार ! म्हणजे सूर्य पश्चिमेलाच उगवला म्हणायचा ! "

" खरंच आई, मी मुलगी पाहायला गेलों होतों आज ! आणि तीसुद्धां कुठची तर रावसाहेब कोठाऱ्यांची ! "

" खरंच का रे सांगतो आहेस हें, शरद् ? का आपली ही तुझी नेहमींचीच थट्टा समजूं मी ? "

" थट्टा नाहीं आई, मी सांगितलेलं अक्षरन् अक्षर खरं आहे अगदीं ! "

" मग पसंत आहे ना तुला ती ? "

" पसंत न होण्यासारखं कांहीं दिसून आलं नाहीं मला तिच्यात ! तरी पण मी त्यांना अणखी आठ दिवसांनीं माझा विचार कळवीन म्हणून सागून आलों आहे ! "

" आठ दिवसांनीं कां होईना, पण देव तुला सद्बुद्धि देवो, आणि हें स्थळ एकदांचें जुळून येवो ! "



त्या दिवसापासून कांतेबद्दलचे विचार शरच्चंद्राच्या डोक्यात धुमाकूळ घालूं लागले. कांतेची मोहक मूर्ति कांहीं केल्या त्याच्या मनश्चक्षूपुढून हालेनाशी होऊं लागली. तिचा हंसरा चेहरा, मिस्किल नजर आणि मधुर भाषण याच्या गोड स्मृतींतच त्याचा बराचसा वेळ जाऊं लागला आणि अखेरीस कांता ही आपल्याला योग्य अशीच वधू असल्याचें त्याने मनाशी ठरविले. आता फक्त रावसाहेबांना रुकार तेवढा द्यावयाचा शिल्लक राहिला होता.

त्या दिवशीं तो जरा नेहमींपेक्षां लवकरच दवाखान्यांत गेला. एक वयोवृद्ध गृहस्थ त्यांची वाट पाहात बसलेले त्याला आढळून आले.

" नमस्कार डॉक्टर ! तुम्हांला घरीं न्यायला आलों आहें. "

" कसली केस आहे ? "

" केस म्हटली म्हणजे अशी; जवळ जवळ सहा महिन्यांपूर्वी माझ्या मुलीच्या उजव्या पायाच्या ढोंपराखालीं गळवासारखं काहींतरी झालं. असेल कांहींतरी क्षुल्लक बाब म्हणून मी त्यावेळीं तिकडे दुर्लक्ष केलं. पण तें बरं व्हायच्या ऐवजीं पसरतच गेलं. त्या वेळेपासून तों या घटकेपर्यंत मी किती औषधें केलीं असतील याचा पत्ता नाहीं. डॉक्टर झाले, वैद्य झाले, जो जो जे जे उपाय म्हणून सुचवी, ते सारे करून पाहिले. पण गुण पडण्याचं कांहींच चिन्ह दिसेना. बिचारी अगदीं बिछान्याला खिळून राहिली आहे. कालच तुमची कीर्ति ऐकली म्हणून आज तुमच्याकडे आलों. तुमच्या तरी हाताला ईश्वर यश देवो ! आणि माझी पोर हिंडतीफिरती होवो ! " बोलतां बोलतां गृहस्थाचा गळा दाटून आला.

लगेच त्या गृहस्थाना घेऊन शरच्चंद्र त्याच्या घरीं गेला. साधारण सोळा वर्षांची एक मुलगी कॉटवर निःस्तब्धपणें पडून राहिलेली होती. तिची मूळची गोरीपान अंगकांति हळूहळू फिकट होत चालली होती. तिच्या डोळ्यातील पाणीदारपणा कायम असला, तरी चेहऱ्यावर एक प्रकारची म्लानता पसरूं लागलेली होती. तिच्या सुंदर मुखावर कारुण्याची इतकी दाट छाया पसरली होती कीं, तिला पाहताच कोणालाही तिच्याबद्दल अत्यंत सहानुभूति वाटावी. शरच्चंद्रही या नियमाला अपवाद नव्हता.

शरच्चंद्राने तिच्या पायाची अगदीं कसून तपासणी केली आणि नंतर त्या गृहस्थाकडे वळून तो म्हणाला, " हिच्या पायाची जखम खोलवर गेलेली आहे, इतकंच नव्हे, तर आतील हाडही आतां कुजण्याच्या मार्गाला लागलं आहे. अगदीं स्पष्टच बोलायचं म्हणजे तुम्हाला जर मुलगी हवी असेल तर शक्य तितक्या लवकर हा एवढा ढोपराखालील पायाचा भाग ऑपरेशन करून कापून काढावा लागेल ! नाहींतर मग मुलीची आशा सोडावी लागेल ! "

शरच्चंद्राचे हें बोलणे ऐकताच तो गृहस्थ मटकन् खालीं बसला ! त्याच्या नेत्रातून अश्रूंची झिरपणी सारखी सुरू झाली.

" डॉक्टर ! मी आता काय करूं हो ! माझी ही एकुलती एक एवढी पोर ! ऐन तारुण्यांत तिला मोडकी करून टाकूं का ? तिच्या साऱ्या जन्माचं नुकसान मी माझ्या हातानं कस हो करूं ? डॉक्टर, बरं होण्याचा दुसरा कसलाच का उपाय शिल्लक राहिलेला नाहीं ? "

" दुसऱ्या उपायाची शक्यता असती, तर हा मार्ग तुम्हांला सुचविला असता का मी ? अगदीं नाइलाज म्हणूनच मी हा शेवटचा उपाय तुम्हाला सुचविला ! "

" अरे देवा ! "

" बाबा, असे हताश काय होतां ? होऊन जाऊं द्या एकदां ऑपरेशन ! येऊन जाऊन लोक मला लंगडी म्हणतील, मोडकी म्हणतील इतकंच ना ? मला नाहीं त्याचं वाईट वाटायचं ! वाईट एवढंच वाटतं, कीं तुम्हाला मात्र मला जन्मभर पोसावी लागेल ! "

" वीणे, पोरी, तूं असं बोलायला लागलीस, कीं माझ्या काळजाचं पाणी होऊन जातं अगदीं ! अगदीं गेल्या वर्षीच वीणे, आपण केवढाले मनोरे रचले होते ! पण ते सगळे आज मातीला मिळाले. थोरामोठ्यांच्या घरांत सुखानं

नांदलेली तुला पाहावी ही माझी इच्छा ! पण—ईश्वरानं किती चमत्कारिक प्रसंग आणला हा ! डॉक्टर, ऑपरेशनला माझी ना नाहीं. पण एकदां पाय कापून काढल्यावर असल्या मुलीला पत्करायला कुणी तरी तयार होईल का ? ”

क्षणभरच शरच्चंद्र गप्प राहिला. एका विलक्षण त्यागभावनेनें त्याच्या हृदयांत ठाणें दिलें. मानवी जीवनात कधीं कधीं असे काहीं क्षण येतात कीं त्या क्षणीं कांहींतरी दिव्य करण्याची इच्छा तीव्रतम होते आणि त्यामुळें पुढील आयुष्याला अगदीं निराळेंच वळण लागते. शरच्चंद्राच्या आयुष्यांतील हा क्षण असाच होता.

“ कां नाहीं होणार ? पृथ्वीच्या पाठीवर अशा तऱ्हेचे उदारहृदयी कांही थोडे नाहींत ! ”

एवढें बोलून शरच्चंद्रानें वीणेकडे एक दृष्टिक्षेप केला. वीणेची कारुण्यपूर्ण नजर आपल्यावरच खिळून राहिली असल्याचा त्याला भास झाला. ती नजर त्याच्या अंतःकरणाला जाऊन भिडली. आपल्या हृदयात कसली तरी विलक्षण कालवाकालव सुरू झाली असल्याचें त्याला आढळून आलें. आपली तिची अनेक वर्षांची ओळख असल्यासारखे त्याला वाटूं लागले. तिच्याबद्दल एक प्रकारची विलक्षण आपुलकी–विलक्षण ओढ त्याला वाटूं लागली. हें असे का व्हावें तें त्याला कळेना !

डॉक्टरांच्या या उद्गारांनीं त्या गृहस्थाच्या निराश हृदयात आशेचा किरण चमकूं लागला.

“ मग डॉक्टर, असा एखादा महात्मा तुम्हाला आढळलाच, तर आम्हाला दाखवून द्याल का ? तुमचे उपकार आम्हीं जन्मभर विसरणार नाहीं. ”

“ जरूर ! जरूर ! ” शरच्चंद्रानें उत्तर केलें.

तिसऱ्या दिवशीं शरच्चंद्राच्या मध्यस्थीनें एका कुशल सर्जनाकरवीं वीणेचें ऑपरेशन करण्यांत आलें. ऑपरेशन सुरक्षितपणे पार पडलें.



शरच्चंद्राच्या अंतःकरणांत त्याग आणि मोह यांचा लढा सुरू झाला. कांतेची आठवण होतांच त्याच्या नजरेसमोर संसाराचीं सुंदर चित्रें उभीं राहत; पण त्या चित्रांपासून त्याच्या हृदयाला आनंद वाटत नव्हता. का कोण जाणे,

पण यात आपल्या हातून काहीतरी स्वार्थी कृत्य होत आहे, असेंच त्याला वाटूं लागले. त्यापेक्षा निव्वळ एका शारीरिक व्यगामुळें मातीमोल होऊं पाहणाऱ्या वीणेच्या जीवनाचें चित्र ज्यावेळीं त्याच्या नजरेसमोर उभें राही, त्यावेळीं त्याची त्यागभावना जागृत होई, आणि या भावनेला ओ देण्यांतच त्याच्या हृदयाला एक अलैकिक आणि दिव्य आनंदाची अनुभूति होई.

वीणेच्या समाचारासाठीं शरच्चंद्राची दिवसातून एक खेप तरी हॉस्पिटलात पडू लागली. तिच्या कॉटजवळ बसून मोकळेपणाने बोलण्यात त्याचे तासचे तास जाऊ लागले. आणि त्याला आढळून आलें की, सुदर चेहऱ्याबरोबर ईश्वराने तिला सुंदर हृदयही बहाल केले होते.

आज वीणला हॉस्पिटलमधून डिस्चार्ज मिळाला होता. आणखी तासाभराने तिचे वडील तिला घरी घेऊन जाण्यास येणार होते.

शरच्चंद्र आज तिची शेवटची भेट घेण्यास आला होता. त्याचा निरोप घेताना वीणेचे डोळे डबडबून आले.

" डॉक्टर, आपले माझ्यावर अनंत उपकार झाले आहेत. माझ्यापायीं आपल्याला बराच त्रास भोगावा लागला. "

" खर आहे! पण दुसऱ्यासाठी त्रास भोगण्यातही मनाला एक प्रकारचं समाधान वाटत असत, हे आहे ना कबूल ? "

" हो, पण ज्याच्यासाठीं आपण त्रास सोसतो, ते माणूस जिव्हाळ्याचं असलं तरच ! "

" मग तुमच्याबद्दल मला जिव्हाळा वाटत नाहीं असं का वाटतं तुम्हाला ? "

" वाटतो का ? इतकं आहे का माझं भाग्य ? "

शरच्चंद्राने आपली स्निग्ध नजर वीणेच्या चेहऱ्यावर खिळविली.

" वीणे, या तुझ्या प्रश्नाचं उत्तर मी कोणत्या शब्दानी देऊं ? "

आपल्याला एकेरी नावानें संबोधिलेलें ऐकून वीणेचे सर्वांग आनंदानें पुलकित झालें.

" माझ्या प्रश्नाचं उत्तर मला मिळालं, " ती म्हणाली, " हृदयाची भाषा बोलून दाखविण्यास शब्द अपुरे पडतात नाहीं का ? "

" खरंच ! तरी वीणे, या तुझ्या प्रश्नाचं उत्तर मी लवकरच देईन ! आणि तेंही शब्दांनीं नव्हे; तर कृतीनं. "

" खरं का हें ? "

" अगदीं खरं ! "

## ५

" आई ! "

" काय रे ? "

" आज रावसाहेब कोठाऱ्याना नकार देऊन आलो. "

त्याची आई यावर एक अक्षरही बोलली नाही. ती त्याच्याकडे नुसती पाहतच राहिली. " आई, तुला राग आला ? "

" छे रे ! राग कसला ? नाही तरी लग्न करायच ते तुझ्याच सुखासाठीं ना ? "

थोडा वेळ थांबून शरचंद्राने विचारलें, " आई, तुला एक विचारू का ? "

" काय तें ? "

" समज, उद्या मला कांहीं अपघात होऊन माझा एक पाय मोडला, तर तूं माझा त्याग करशील का ग ? "

" चल ! भलतंच काहीं तरी ! असं काही तरी अभद्र बोलूं नये, शरद् ! "

" आई, समज एखाद्या निर्व्यंग धडधाकट मुलीशीं माझं लग्न झालं, आणि लग्नानंतर थोड्या दिवसानी तिला असाच काही अपघात होऊन तिचा एक पाय निकामी झाला, तर तिला तूं दूर लोटशील का ग ? "

" अरे, आज तुला झालंय् तरी काय ? आपल्या माणसांत कितीही व्यंगं असलीं म्हणून का त्याना कोणी टाकून देतात ? "

" पण समज, अगोदरच एखादीचा पाय कांहीं अपघातानं मोडला असेल आणि अशा मुलीशीं मी लग्न केलं तर—तर काय करशील ? "

" तर तिलाही मी माझ्या मुलीप्रमाणें प्रेमानं वागवीन ! " ती बोलून गेली.

हळू हळू वीणेबद्दलची सर्व हकीकत त्यानें तिला निवेदन केली.

" मग तिचीच निवड तूं कायम केलीस ना ? " तिनें विचारले.

" होय ! " शरच्चंद्रानें उत्तर दिलें.

" देवाची मर्जी ! " इतकेच शब्द तिच्या तोंडून बाहेर पडले.



## दूषित दृष्टिकोन !



तसं पाहिलं तर श्रीकांत कांहीं समाजसत्तावादी नव्हता. पण गरीब आणि धनिक याच्या राहणीत दिसून येणारी विषमता त्याला इतक्या तीव्रतेनें जाणवे, की आपल्या लेखांत, गोष्टीत आणि कादंबऱ्यात या विषमतेवर त्यानें आपलें हत्यार उपसले नाहीं असे कधीच झालें नाहीं. समाजावर ओढवणाऱ्या साऱ्या विपत्तीचे कारण म्हणजे हा धनिक वर्ग अशी त्याची ठाम समजूत होऊन गेली होती. अर्थात् समाजातील अगोपागाची तो ज्यावेळी आपल्या लेखनांत चर्चा करी त्यावेळी याच धनिक वर्गाचे अत्यंत भेसूर असे स्वरूप तो वाचकापुढें उभें करी. या धनिक वर्गात मध्यम वर्गाचाहि तो समावेश करीत असे हें सागणें नकोच !

चटकदार, मोहक आणि अलंकारिक भाषाशैलीमुळे त्याच्या लिखाणावर समाजाच्या उड्या पडत. तत्त्वापेक्षा इतर तपशिलाच्या आकर्षकत्वामुळें तो विशेष लोकप्रिय झाला होता. पण त्याला मात्र वाटे कीं, आपली तत्त्वेंच लोकांना अधिकाधिक पसंत पडत चालली असून त्याचमुळे आपला वाढता बोलबाला होत आहे.

समाजातील याच घातुक विषमतेवर तो एक सुंदर नाटक लिहित होता. हें नाटक होईल तितकें निर्दोष आणि सर्वांगसुंदर करण्याची तो मनापासून खट-पट करीत होता. आपले नाटक अत्यंत लोकप्रीय होईल असा त्याला पूर्ण विश्वास होता. त्याची लाडकी हेमलता आणि लहानगा नंदू हीं आधल्याच महिन्यांत कोंकणांत गेलीं असल्यामुळें लेखनाला जरूर असलेला एकांतही त्याला भरपूर मिळत होता.

मी श्रीकांताचा अगदीं जिव्हाळ्याचा दोस्त ! कांहीं कांहीं बाबतींत जरी आमचे कधीं कधीं खटके उडत असले तरी इतर अनेक बाबींतील त्याची विचारसरणी मला पसत पडे.

त्या दिवशीं मी नेहमींप्रमाणें त्याच्याकडे गेलों होतों. स्वारी लेखनांत अगदीं दंग होऊन गेली होती.

" काय श्री, गृहस्था चहाबिहा तरी करून घेतलास कीं नाहीं ? " मी म्हटलें.

" नाहीं रे ! अलीकडे चहा घरीं करायचें सोडूनच दिलें आहे मी ! अगदीं लहरच आली तर समोरच्या हॉटेलवाल्याला ऑर्डर द्यायची कीं पाच मिनिटात चहा तयार ! "

हं ! पण श्रीकांत, ही श्रीमंतीचीं लक्षणें तुला रे कुठून आठवायला लागलीं ! गरिबांचा कैवारी म्हणवतोस ना तूं आपल्याला ? " मी हंसत हंसत म्हणालो.

तोही मनापासून हंसला.

मी त्याच्या हातातील नाटकाचें हस्तलिखित काढून घेऊन तें हळुहळू वाचूं लागलों.

" श्रीकांत, पिढीजात वैभवात लोळणाऱ्या वर्गावर जो हा तूं दांत धरला आहेस तें योग्य आहे असें एका अर्थी म्हणता येईल, पण बिचाऱ्या मध्यम वर्गावर जे तूं कोरडे ओढले आहेस ते मात्र अप्रासंगिक आणि अन्यायाचे आहेत असें म्हटल्यावाचून माझ्यानें राहवत नाहीं. "

" बरोबरच आहे यशवंत ! तूं स्वतःच मध्यम वर्गापैकीं असल्यामुळें त्याची कड घेणें तुला क्रमप्राप्तच आहे. अरे बाबा, वैभवाच्या शिखरावर असलेल्या धनिकाशीं तूं मध्यम वर्गाची तुलना करूं लागलास तर मध्यम वर्गाची तरफदारी करण्याचा मोह तुला पडणारच ! पण समाजाच्या अत्यंत खालच्या वर्गाची तूं आपल्या मध्यम वर्गाशीं तुलना करून पहा आणि मग मला साग कीं मी या वर्गावर उडवलेले कोरडे योग्य आहेत कीं नाहींत ते ! "

" श्रीकांत, तुला राग येणार नाहीं तर सांगतों—माझा अनुभव असा आहे कीं मध्यम वर्गातील बऱ्याच जणांची स्थिति तूं म्हणतोस त्या कनिष्ठ वर्गाहूनही अधिक शोचनीय आहे ! "

" छट्, मला नाहीं हें पटत ! "

" पटेल ! आज नाहीं पटलं तर उद्या पटेल ! "



श्रीकांताच्या नवीन नाटकाचा न भूतो न भविष्यति असा बोलबाला झाला. नाटक अत्यंत लोकप्रिय झालें. मजूर आणि भांडवलवाले, शेतकरी आणि पांढरपेशे, कनिष्ठ वर्ग आणि उच्च वर्ग यांच्या जीवनांतील विविध छटा त्याने आपल्या नाटकातून अत्यंत मार्मिकपणे आपल्या विनोदगर्भ भाषाशैलीने रंगविल्या होत्या. गरिबाचा कैवारी आणि त्याच्या जीवनाशी समरस होणारा लेखक या नात्यानें लोक त्याला आता ओळखूं लागले होते.

त्या दिवशीं तो आणि मी त्याच्या घरीं गेलों. आम्ही कपडे उतरतों न उतरतो तोंच तारवाल्याने श्रीकांताच्या हातात एक तार दिली. कुणाची बरें असेल ही तार ? मी विचार करूं लागलो. एका चुलत्याशिवाय श्रीकांताच्या कुटुंबात दुसरे वडीलधारे असे कुणीच नव्हते. श्रीकांताची पत्नी आणि मुलगा ही तर आधीच कोंकणात गेलेली !—अरे पण किती वेडा आहे मी ! माझ्या मनात अमंगळ तेवढेच नेमके विचार का यावेत ? कुणातरी बड्या माणसाचीही अभिनंदनपर तार नसेल कशावरून ? हो, असंच असलं पाहिजे.

पण मला फार वेळ संशयांत रहावें लागलें नाहीं. " नाना अत्यवस्थ आहेत. तुम्हाला भेटण्याची त्याची अंतकाळची इच्छा आहे. त्वरित यावे. " अशा अर्थाचा तारेतला मजकूर श्रीकांताने मला वाचून दाखविला.

" मग काय ? कधी निघायचा बेत करतोस ? " मी विचारलें.

" उद्यांच्याच बोटीनें जरूर गेलं पाहिजे मला. यशवंत, तुला ठाऊकच आहे, कोंकणांत पाऊल ठेवल्यास मला आता जवळ जवळ एक तप होत आलं. आता गेल्यासारखं जन्मभूमीचें दर्शनहि घडेल आणि नानाची शेवटची इच्छाहि तृप्त होईल ! "

आपल्याबरोबर चलण्याबद्दल श्रीकांतानें मला बराच आग्रह केला. मलाही कोंकण पाहण्याची फार इच्छा असल्यामुळें मी त्याच्या म्हणण्याला अनुमति दिली. लगेच दुसऱ्या दिवसाच्या बोटीनें आम्ही निघालों.

आम्हीं घरीं पोंचलों त्यावेळीं सूर्य बराच वर आला होता. प्रवासाच्या दगदगीनें आम्हीं बरेच त्रासून गेलों होतो. तशात भूकही कडकडून लागलेली, पण घरांतील तें एकंदरींत उदास आणि गंभीर वातावरण पाहून आमची सारी भूकतहान कुठच्या कुठेंच पळाली.

आम्हीं आलों ते थेट नानांच्या खोलींत गेलों. नाना आतां कांहीं फार वेळाचे सोबती राहिले नाहींत असे आम्हाला जवळच बसलेल्या वैद्यबुवांकडून कळलें. श्रीकांत हलकेच जाऊन नानांच्या उशापाशीं बसला.

अत्यंत हलक्या आणि मृदु स्वरानें तो म्हणाला, "नाना, मी आलों आहे."

" मी " म्हणजे कोण हे कळावयास नानांना बराच वेळ लागला. आपले निःसत्व डोळे किंचित् उघडल्यासारखे करून नानानीं श्रीकांताला खुणेने जवळ बोलावले. " श्री ! मी चाललो, माझ्या पोराबाळाना दूर लोटू नकोस ! त्यांच्या डोक्यावर अनंत कर्ज "-- इतके शब्द अत्यंत सायासाने कसेबसे उच्चारतांच त्याना बराच थकवा आल्यासारखा वाटला. त्यानीं डोळे मिटले आणि ते कायमचेच मिटले !



आम्हांला येऊन आता हळुहळु तीन आठवडे झाले. नानांना बरींच मुलें होतीं पण त्याचा सर्वात वडील मुलगाहि अजून " सज्ञान " या संज्ञेस प्राप्त झाला नव्हता. या साऱ्याची काय सोय करावी हा श्रीकांतापुढे मोठाच प्रश्न येऊन पडला. या विषयावर आता आमचा नेहमी खल होऊ लागला. पण निश्चित असें कांहींच ठरेना !

त्या दिवशीं श्रीकांत, हेमलता आणि मी असे तिघेजण याच विषयाची चर्चा करीत होतों. पण दोघां अनाहूत पाहुण्यांच्या आगमनामुळे आम्हांला तो विषय तेथेंच थांबवावा लागला. आलेले दोघेही पाहुणे म्हणजे नानाचे कर्जदार होते. नानांनीं वेळोवेळी त्याच्याकडून कर्ज घेतले असल्यामुळे त्या कर्जाचा आंकडा आतां बराच फुगला होता. कर्जाचे हे आकडे ऐकून श्रीकांताची छातीच दडपून गेली.

" श्रीकांत, यांतील निम्या तरी रकमेची या चार दिवसात फेड झाली तर ठीक आहे, नाहींतर आम्हांला नाइलाजानें शेवटचा उपाय योजावा लागेल ! " अशी धमकी देऊन ते निघून गेले.

ही एवढीच रक्कम कशी उभी करावी हाच आतां आमच्या पुढयांत मोठा प्रश्न येऊन पडला. नानाना एवढें कर्ज कशापायीं झाले तें तरी कळावें म्हणून आम्हीं त्यांच्या साऱ्या हिशेबाच्या वह्या पालथ्या घातल्या. नानांचा पैन् पैचा

व्यवहार त्यांत आम्हांला सांपडला. त्यांना झालेलें कर्ज निव्वळ कुटुंबाच्या जीवनधारणेसाठीच होतें, यात आम्हाला संदेह राहिला नाहीं.

कर्जदाराची रक्कम फेडण्यास आतां फक्त एकाच दिवसाचा अवधि राहिला होता. श्रीकाताने व मी मिळून थोडीशी रक्कम उभी केली होती. पण ती एकंदरीत बरीच अपुरी पडत होती. पुढें काय करावें या विचारात मी आणि श्रीकांत असता हेमलता हातात काहींसें घेऊन तेथे आली.

" ही घ्या भरीची रक्कम ! " श्रीकाताच्या हातात नोटा देत ती म्हणाली.

" कुठून आणलीस ही रक्कम ? " श्रीकाताने आश्चर्याने विचारलें.

" मी सागितलें तर त्यावर आपला विश्वास बसेल कां ? " तिनें विचारलें.

" वा ! हा काय प्रश्न ? " श्रीकाताने हंसत हंसत म्हटलें.

" हे पैसे मी त्या फटूच्या बायकोकडून उसने मागून आणले. "

" फटूच्या ? त्या कुळवाड्याच्या ? "

" त्यात एवढे आश्चर्य वाटायला काय झालें ? अलिकडे आमच्या तुमच्याकडे नसेल एवढा पैसा या कुळवाडी लोकाकडे झाला आहे, असें नाना नेहमी म्हणायचे. तेवढयावरून म्हटलं पहावं सहज एखादा दगड मारून ! म्हणून केला प्रयत्न ! "

त्या कर्जदाराचीं तोंडे आम्हीं तात्पुरतीं कशींबशीं बंद केलीं. पण तीं कायमचीं बद करावी या हेतूने आम्हीं नानांच्या मालकीचा एक जमिनीचा तुकडा विकावयास काढला. लवकर व चांगलें गिऱ्हाईक मिळावे म्हणून आम्हीं ही बातमी प्रत्यक्ष अप्रत्यक्ष रीत्या जाहीरहि करून टाकली.

पण पाढरपेशा वर्गातील एकही हरीचा लाल आमच्याकडे फिरकला नाहीं. आम्ही गांवांत बरीच चौकशी केली. आणि आम्हांला कळून चुकले कीं घरोघर मातीच्याच चुली. एक दोन अपवाद सोडल्यास साऱ्याच पांढरपेशांची स्थिति अत्यंत हलाखीची झाली होती. कसल्याच तऱ्हेची व्यसनाधीनता नसूनही अगर उधळपट्टीची संवय नसूनही केवळ कुटुंबपोषणार्थच या लोकांवर कर्जाच्या भाराखालीं दबले जाण्याचा प्रसंग यावा ही वस्तुस्थिती सत्य असली तरी करुणास्पद होती, यांत शंका नाहीं.

अशा तऱ्हेचे विचार आमच्या मनांत घोळत असतांच खांद्यावर फटकूर टाकलेला एक कुळवाडी आमच्या घराच्या पायऱ्या चढत असलेला आम्ही पाहिला. त्याच्याचकडे खंडाला दिलेली जमीन आम्हीं विक्रीला काढली होती.

सुरवातीला नानाची भरमसाट स्तुतिस्तोत्रें गाण्यास त्याने सुरवात केली. नानासारखा धनी कधीं झाला नाहीं आणि पुढें कधीं होणार नाहीं हाच त्याच्या एकंदर चर्पटपंजरीचा सारांश होता.

" मग म्हणणं काय तुझं आता ? " श्रीकातानें विचारले.

" दुसरा काय आसतांला धनूयानू ! ती जमीन दुसऱ्या कोणाक् देवऱ्या-पेक्षां माकांच विकत द्या सायूबानूं ! मी ती घेयून् विकत ! "



श्रीकांताच्या अलीकडच्या लेखनात मध्यम वर्गाची बरीच तरफदारी केलेली दिसून येत असते !



# भोग ?–नव्हे; त्यागच !



उद्या आपली तुरुंगांतून सुटका होणार या कल्पनेनें रमेशचें मन आनंदित झालें. गेले सहा महिने ज्या स्वातंत्र्यसुखाला आपण मुकलों होतों, तें सुख अवघ्या चोवीस तासांच्या आत पुनश्च आपले होणार या जाणीवेनें त्याच्या अंतःकरणाला हर्षाच्या गुदगुल्या होऊं लागल्या.

ध्येयवाद आणि देशप्रेम यांनीं प्रेरित झाल्यामुळेच त्याला तुरुंगाची कोठडी पहावी लागली होती. पण या दोन्हीं गुणाचा पाया असावा तेवढा खंबीर नव्हता. खोल विचाराचे पाठबळ आणि बुद्धीचा निश्चितपणा हे पायाचे दोन्हीं दगड बरेचसे डळमळीत राहिले होते. उलट तारुण्यात सहजसाध्य असलेली भावनेची उत्कटता आणि देशभक्तीमुळें मिळणारी सवंग लोकप्रियता या दोन गोष्टींनीं प्रेरित होऊनच त्याने आपल्यावर हा तुरुंगवास ओढवून घेतला होता. रमेश गतवर्षीच एम्. ए. झाला होता. पण समाजांतील त्याचा योग्य दर्जा अजून ठरावयाचा असल्यामुळें मॅजिस्ट्रेटने त्याला ' सी ' क्लासांत ढकललें होतें. गेल्या सहा महिन्यांत या क्लासात भोगाव्या लागणाऱ्या विविध हालअपेष्टांनीं आणि तज्जन्य मानसिक त्रासाने त्याच्या ध्येयवादाची सफेती पार धुवून निघाली होती. त्याच्या मनांत एक प्रकारचे परिवर्तन घडून येत होतें. ध्येयासाठीं असो अगर देशासाठीं असो, मी आपल्या सुखाचा बळी कां द्यावा ? आधींच टीचभर असलेल्या या आयुष्याची मी अशा रीतीनें धुळधाण कां म्हणून करावी ? मी तरुण आहें, सुशिक्षित आहें, आणि घरचाहि खाऊन पिऊन सुखी आहें. मग जें अत्यंत कष्टसाध्य आहे अगर जें कदाचित् या आयुष्यांत कधींही साध्य होणार नाहीं अशा अदृष्ट ध्येयाच्या खुळचट कल्पनेच्या नादीं लागून मी हातीं असलेलीं सुखाचीं साधनें कां म्हणून दूर लोटावीं ? लोक आपल्याला स्वार्थी म्हणतील ! म्हणोत बिचारे ! या जगांत स्वार्थापासून अलिप्त असा कोण हरीचा लाल आहे ? आपला स्वार्थ जोंपर्यंत दुसऱ्याच्या सुखाआड येत नाहीं, तोंपर्यंत तरी तो क्षम्य आहे असें कां समजूं नये ? बस्स ! त्यागाबिगाच्या कल्पना आज-

पासून पार धुडकावून लाविल्या पाहिजेत. अगदीं या क्षणापासून मी भोगवादी झालों आहे! भोग! भोग!! आता तुरुंगातून सुटताच साऱ्या सुखाचा यथेच्छ उपभोग घ्यावयाचा आणि गेल्या सहा महिन्यांचा वचपा भरून काढावयाचा!

—पण! आपली पत्नी–! ती या विचारात मला साथ करील का? छे! आपण केवढी मोठी चूक करून बसलो. ध्येयाच्या नादीं लागून आपल्या विचाराशीं जीचे विचार जुळतील अशी पत्नी मी केली खरी, पण आज माझ्या या बदलत्या कल्पनांमुळें ती माझ्या सुखाच्या आड यायची! तिच्याहि विचारांत अशीच क्रांति झाली असेल का? ती बी. ए. आहे. तिचीं मतें खंबीर आहेत! आपल्याइतकें सहजासहजीं तिचें मतपरिवर्तन होणे हे जवळ जवळ अशक्यच! तिला हा माझा भोगवाद कसा पटावा? उलट माझ्या मतपरिवर्तनावर ती दुबळेपणाचा शिक्का मारल्याशिवाय राहणार नाही. तिचे माझे नेहमींच खटके उडत राहतील. ज्या माझ्या गुणावर लुब्ध होऊन तिने माझ्याशीं लग्न केलें त्या गुणावरच आता तिलांजली सोडल्यावर माझ्यावरील तिच्या प्रेमाला ओहोटी लागणार नाहीं का? ती माझ्याकडे तिरस्काराने पहाणार नाहीं का? पण—पण मी आता बोलूनचालून भोगवादी बनलो आहे. भोगवाद्यानें आपल्या सुखाच्या आड येणाऱ्या बंधनाना तरी का जुमानावें? माझी पत्नी माझ्या सुखोपभोगाच्या आड येऊं लागली तर लग्नाचे बंधनही मी पार झुगारून देईन! बंधनात असणाऱ्या मर्यादित सुखापेक्षा स्वैरपणात असणाऱ्या अमर्यादित सुखाचाच मी आतां उपभोग घेणार! एक दिवस मरावयाचेंच! मग जीवितांतील जास्तींत जास्त सुखें अधिकात अधिक वेळ उपभोगून मगच मेलेलें काय वाईट?

दुसऱ्या दिवशीं रमेशाची तुरुंगांतून सुटका झाली. कारागृहांतून बंधमुक्त झालेल्या देशभक्ताला जनतेकडून जो मान मिळावयाचा तो सर्व त्याला मिळाला. पण त्याच्या चोरट्या मनाला त्या मानसन्मानापासून आनंद झाला नाहीं. 'देशभक्तीला आतां आपण लवकरच रामराम ठोकणार आहों ही गोष्ट जेव्हां या लोकांना कळेल त्यावेळीं हेच लोक—पण मला आतां या लोकाशीं तरी काय करायचं आहे? लोकप्रियतेची तहान भागवून घ्यायला मला दुसऱ्या अनेक वाटा मोकळ्या आहेत.' त्यानें आपल्या मनाचें समाधान करून घेतलें.

घरीं जातांच त्याच्या हातांत एक तार पडली. पाटवड गांवीं स्वतःस शिक्षण-संस्थेस वाहून घेतलेल्या त्याच्या पत्नीची ती तार होती. "सुटकेबद्दल अभिनंदन; शिक्षणासंबंधीं आयत्या वेळीं उद्भवलेल्या कांहीं अपरिहार्य कारणामुळें आपल्या सुटकेच्या वेळीं मला तिकडे येतां आलें नाहीं याबद्दल क्षमा असावी. तार पोहोचताच आपण ताबडतोब निघून इकडे यावें." असा एकंदरींत त्या तारेचा मतितार्थ होता. तारेला काय जबाब द्यावा याचा रमेशला विचार पडला. आगामी झटापटीचा पहिलाच प्रसंग इतक्या लवकर येईल ही त्याची कल्पना नव्हती. पण आलेल्या प्रसंगाला तोंड दिल्यावांचून गत्यंतरच नसल्यामुळें उत्तरादाखल त्यानें आपल्या पत्नीस खालील पत्र लिहिलें:—

'वसुंधरे'

तुझी तार पोहोंचताच मी निघून येईन ही तुझी खात्री असल्यामुळें तूं माझी मार्गप्रतीक्षा करीत असशील! पण माझ्याऐवजी हे पत्रच तुझ्या भेटीला आलेले पाहून तुझी निराशा होईल हे मी जाणून आहे. पण त्याहीपेक्षा अधिक निराशा पत्रातील मजकूर वाचून होण्याचा संभव असल्यामुळे अधिक काही न लिहिणेंच चांगले. तुरुगात असताना मी माझ्या ध्येयाचा आणि परिस्थितीचा बराच विचार करून असें नक्की ठरविले आहे की यापुढे राजकारणापासून सर्वस्वीं अलिप्त राहावयाचे! तुरुंगवासातील हालअपेष्टाना घाबरून मी हा असा निश्चय केला आहे असा तूं माझ्यावर आरोप करशील! हा तुझा आरोप मला सर्वस्वीं मान्य आहे. पैसा, पदवी आणि तारुण्य ह्या सुखाच्या साधनानी मी संपन्न असतांना केवळ काल्पनिक ध्येयवादाच्या मागे लागून व्यर्थ हालअपेष्टा सोसणें हा निव्वळ मूर्खपणा आहे असें माझे ठाम मत बनलें आहे. सुखासमाधानाचा उपभोग घेत असतांना जर कांहीं सहजासहजीं लोककल्याण हातून घडले तर उत्तमच! पण निव्वळ लोककल्याणासाठींच दैहिक अगर मानसिक आत्मक्लेश सोसणें हें तत्त्व दिसण्यांत कितीहि मोहक दिसत असले तरी त्याच्या आहारीं इतःपर न जाण्याचा मी बेत केला आहे. जाता जाता तुलाहि दोन शब्द सांगावेसे वाटतात. खेडेगांवांत राहून शिक्षणासारख्या किचकट् कार्यांत स्वतःचें अमूल्य आयुष्य निरर्थक घालविणें हें मोठमोठ्या पुरुषानाहि साधत नाहीं. म्हणून तूंहि हा नाद सोडून इकडे निघून यावे हें योग्य! उपभोगाच्या

उपजत वासनांचा कोंडमारा करणें हें एकंदरींत अहितकारकच ! कारण अशा या दाबून टाकलेल्या वासना मरून न जातां मानससरोवराच्या तळाशीं दबा धरून बसतात आणि मग हळूच केव्हांतरी संधि सांपडतांच आपलीं डोकीं वर काढतात हें मानसशास्त्राचें प्रमेय तुला माहित नाहीं काय ? तरी माझ्या येण्याची वाट न बघता हे पत्र पोहोंचताच तूं ताबडतोब निघून येशील अशी आशा आहे.

या क्षणापर्यंत तर तुझाच

—रमेश

**ता. क.**—मी आपलें यापुढील आयुष्य लेखन–व्यवसायांत घालविण्याचें ठरविलें आहे.

—रमेश

पत्र पोष्टांत पडतांच आपल्या डोक्यावरील एक मोठें ओझें कमी झाल्यासारखें रमेशला वाटलें. आपली बदललेलीं मतें पत्नीच्या कानांवर कधींना कधीं घालावीं लागणारच होतीं. हें कार्य आज हातावेगळें केल्यामुळें त्याच्या हृदया-वरील अर्धेअधिक दडपण कमी झालें.



वसुंधरेचें पत्र रमेशनें भीतभीतच फोडलें. तें त्याच्या पत्राचें उत्तर होतें.—

" **रमेश,**

आपलें पत्र मिळालें. तें पत्र नसून वीजेचा तीव्र झटकाच असल्याचा मला भास झाला. आपलें अक्षर माझ्या पूर्ण परिचयाचें नसतें तर हें पत्र आपण लिहिलें नसून आपलें नांव धारण करून कोणीतरी तोतयानेंच हा उपद्व्याप केला असावा अशी माझी ठाम समजूत झाली असती. पण आपलें हस्ताक्षर पाहून पत्र आपणच लिहिलें आहे यांत तिळमात्र संशय राहिला नाहीं.

एकूण संकटाची पहिली झळ लागल्याबरोबर आपल्या ध्येयाचा पर्वत वित-ळून गेला म्हणायचा ! ध्येयाचा मार्ग आक्रमतांना लागणाऱ्या धीरगंभीरप-णाचा आपल्यापाशीं पूर्ण अभाव आहे हें आपल्या पत्रावरून मला कळून आलें. आपल्या मतांतरास मतांतर हें म्हणण्यास माझी जीभ धजत नाहीं. कारण हें खरेंखुरें मतांतर नसून आपल्या कैक भोगवासनांची तृप्ति करून घेण्यासाठीं तुमच्या कमकुवत मनानें पुढें केलेली ही एक क्लृप्तिच होय हें उघड आहे.

पैसा, पदवी आणि तारुण्य या त्रयीनें आपण संपन्न आहात ही गोष्ट कबूल ! पण या साधनाचा उपयोग दुसऱ्याच्या कल्याणाकरता न होतां स्वतःच्या स्वार्थी वासनापूर्तीसाठींच तीं खर्चे पडलीं तर या तिन्हीं साधनांना तुम्ही अगदीं अल्पावधींतच मुकल्याशिवाय राहणार नाहीं हे पक्के लक्षात असूं द्या ! भोगलालसेचा संयम करणें म्हणजे मूर्खपणा होय हे तुमचे तत्त्व अंमलात आणल्यास समाजांत लवकरच अनवस्था प्रसंग माजल्याशिवाय राहणार नाहीं हे तुमच्यासारख्या सुशिक्षितास सागण्याची पाळी मजवर यावी याहून अधिक दुर्दैव ते कोणते ? पण मी वर म्हटल्याप्रमाणे जाणून बुजून झोपेचे सोंग घेतलेल्या मनुष्यास कोण कसे जागे करील ? असो.

तुमच्याशी विवाहबद्ध होताना आपल्याबद्दलच्या ज्या आशा आकांक्षा मी मनात बाळगल्या होत्या त्या तुमच्या पत्रानें आज कवडीमोल करून टाकल्या याचे वाईट वाटते. ज्या दिवशीं, ज्या क्षणी आपण आपल्या पवित्र ध्येयाचा संबंध तोडून टाकलात त्या दिवशी, त्या क्षणीच आपला व माझा संबंध काय द्याने नसला तरी मनाने तरी तुटला हे पक्के समजून राहावें. इतःपर आपणास वाटेल ते करण्यास आपण पूर्ण मोकळे आहात—समर्थ आहात !—यापेक्षा अधिक काय लिहू ?

आपल्या ध्येयाबरोबरच आपल्याला सोडून गेलेली

**वसुंधरा**

**ता. क.**—आपले यापुढील आयुष्य आपण लेखन व्यवसायांत घालविणार असल्याचे लिहिता ! पण निव्वळ स्वार्थी वासनापूर्तीला आयुष्य वाहणाऱ्या ध्येयशून्य लेखकाचें लिखाण सरस्वतीच्या मंदिरांत काय दिवे लावणार ते दिसतेंच आहे. उलट आपल्या दुबळ्या मनोवृत्तीची वकिली करून अनेक ध्येयनिष्ठ पण अपरिपक्व बुद्धीच्या तरुणाना मार्गभ्रष्ट करण्याचाच संभव जास्त ! उज्वल चारित्र्याचा लेखकच उच्च व स्थायिक स्वरूपाचें वाङ्मय निर्माण करूं शकतो हे तत्त्व डोळ्याआड करून कसें चालेल ?

**वसुंधरा**

हा प्रसंग रमेशला अनपेक्षित नव्हता. एकप्रकारें हें पत्र वाचून त्याला समाधानच वाटलें यांत शंका नाहीं. पत्नीनें आपला संबंध—मनानें का होईना तोडून टाकल्यामुळें आतां ‘ मनःपूतं समाचरेत् ’ हें तत्त्व अमलांत आणण्याच्या मार्गोतील एक मोठी धोंड दूर झाली असेंच त्याला वाटलें.



कालाच्या अंगीं "कुर्तुमकर्तुम्" शक्ति वास करीत असते हे वसुंधरेला माहित नव्हतें असें नाहीं. पण त्याच्या प्रभावाची प्रचीति आपल्याला इतक्या लवकर येईल ही तिची कल्पना नव्हती. किती थोडक्या वेळात रमेशच्या मनःसृष्टींत क्रांति घडून आली होती! रमेशसारख्या ध्येयवादी, सुशिक्षित तरुणाशी विवाहबद्ध होतांना तिला किती धन्य धन्य वाटले होते! भावी आयुष्याचे त्या वेळीं तिने केवढाले गगनचुंबी मनोरे उभारले होते! रमेशला बंदीवासाची शिक्षा झाली त्यावेळीं तर हे काल्पनिक मनोरे अल्पावधीतच मूर्त स्वरूप धारण करतील अशी तिने आपल्या मनाशी खूणगांठदेखील बांधली होती! तेच मनोरे आज मातीमोल होऊन पडलेले पाहून तिला काय वाटले असेल! रमेश बंधमुक्त होताच आपण दोघेजण पूर्वीपेक्षा अधिक जोमानें स्वतःला समाजसेवेला वाहून घेऊ आणि एकदीलानें पुढील आयुष्य व्यतीत करू ही कल्पनाचित्रे आता स्वप्नसृष्टींतीलच ठरल्यानें तिची अतोनात निराशा झाली. आणि या सगळ्या गोष्टींना कारणीभूत झालेल्या रमेशच्या दुर्बल मनोवृत्तीचा तिला फार राग आला.

पण एवढयाचमुळे खचून जाण्याइतकें तिचे मन लेचेपेचें नव्हते. पूर्वीच्याच उत्साहाने तिने आपले शिक्षणदानाचे व लोकसेवेचे व्रत तसेंच पुढे चालू ठेवलें. पाटवडगावीं तिचें नांव माहित नसलेला माणूस क्वचित् असेल! आबालवृद्धांच्या तोंडीं तिचे असें नाव व्हावयाला कारण म्हणजे वेळी अवेळीं झीज सोसून दुसऱ्याच्या उपयोगीं पडण्याची तिची तत्परता आणि तिचा प्रेमळ व मनमिळाऊ स्वभाव याची त्यांत भर! दिवसामागून दिवस जात होते. एक दिवस नेहमींप्रमाणें वर्तमानपत्र चाळीत असतां एका नवीन प्रसिद्ध झालेल्या कादंबरीच्या जाहिरातीवर तिची नजर गेली आणि ती क्षणभर तिकडच खिळली. त्या कादंबरीचा लेखक दुसरा तिसरा कुणी नसून रमेशच होता. लेखकाच्या मनोवृत्तीचें प्रतिबिंब थोड्याफार प्रमाणात त्याच्या कृतींत उतरल्याविना राहात नाहीं, असें तिचें मत असल्यामुळे तिनें लगेच तें पुस्तक मागविलें.

पुस्तक हातात पडताच तिने समग्र वाचून काढलें. मधुर आणि मोहक भाषाशैलीच्या आवरणाखालून स्वैर आणि बेलगामी विचारांचे पाट वाहत होते. उत्तान शृंगाररसानें थबथबलेली ती कादंबरी वाचून तिला शिसारी आली. परीक्षणाच्या निमित्तानें तिने लगेच त्या कादंबरीची एका नियतकालिकात खरपूस

हजेरी घेतली. पण या कामांत तिला कोणी भागीदार सापडले नाहींत. बहुतेकांनी त्या कादबरीची स्तुतिस्तोत्रेच गायिली. ' नवविचाराची आणि स्वतंत्र वृत्तीची ' ही कायम ठशाची सवंग विशेषणे लावून बहुतेक टीकाकार मोकळे झाले. या अनुकूल टीकेमुळेच कीं काय रमेशला प्रोत्साहनच मिळाल्यासारखें दिसले. कारण अशाच नमुन्याच्या उत्तान शृंगाराचा उत्तरोत्तर उत्कर्ष होत गेलेल्या एकामागून एक नवीन कादबऱ्या त्याच्या लेखणीतून बाहेर पडूं लागल्या. जिकडून तिकडून स्तुतिसुमनाचा वर्षाव होऊ लागला. लोकप्रियतेची माळ रमेशच्या गळयात पडली; "महाराष्ट्राचा आवडता लेखक" हें विशेषण त्याच्या नावामागे कायमची रूढ होऊन बसली.

पण वसुधरेने आपले निष्ठुर कर्तव्य बजावण्यात मुळीच कसूर केली नाहीं. झाडून साऱ्या कादबऱ्यावर तिने प्रतिकूल टीकेची झोड उठवली. आणि त्याचे खरे स्वरूप उघड करून तिने लोकांपुढे माडले.



तीन वर्षांचा काळ हा हा म्हणता केव्हाच निघून गेला. या काळात रमेशच्या स्वैर वर्तनाच्या अनेक अनिष्ट गोष्टी वसुधरेच्या कानावर येऊन गेल्या होत्या. अलिकडे बरेच दिवस त्याच्या लेखनातही बराच खंड पडलेला दिसत होता. मध्यतरीं रमेश एका सिनेमा कंपनींत कथालेखक म्हणून राहिल्याचेहि वृत्त तिच्या कानी आले होते. पण त्यानंतर मात्र त्याचे नाव कुणालाच ऐकू येईनासे झाले.

त्या दिवशी वसुधरेची तब्यत थोडीशी बिघडल्यासारखी झाली होती. त्या दिवशी ती आपल्या आवडत्या शाळेतहि गेली नाहीं. शाळेत न जाण्याचा असा प्रसग तिच्यावर क्वचितच येई. त्यामुळे वसुंधरा आज न आलेली पाहून सारी शाळाच तिच्या समाचाराला लोटली. पराचा कावळा व्हावयाला कितीसा वेळ लागतो ? हळुहळू गांवांतील बरीच मंडळी तिची विचारपूस करून जाऊं लागली.

शाळेंतल्या एका मुलीचा चुलतभाऊ—हा डॉक्टर असून मुंबईत त्याची "प्रॅक्टीस" बऱ्याच जोमांत चालत असे—धंद्यानिमित्त गेल्या आठवडयांत पाटवडगावीं आला होता. बहिणीच्या आग्रहावरून तो वसुधरेची प्रकृति पाहावयांस गेला. डॉक्टरला उगाच तसदी दिल्याबद्दल वसुंधरेने त्या मुलीला दोष दिला.

" पण बाई, तुम्हीं मात्र सर्वांची सेवा नेहमींच करावी आणि आम्हीं मात्र एक दिवसदेखील तुमच्या उपयोगीं पडूं नये हा कुठला न्याय ?" ती मुलगी म्हणाली.

"तसें नव्हे ग वेडे ! एकतर माझी प्रकृति काहीं विशेष बिघडलेली नव्हती, तशात हे डॉक्टर मुद्दाम आपल्या कामासाठी या गावी आलेले ! त्याचा अमूल्य वेळ—"

" छे, छे, छे !" डॉक्टर मध्येंच म्हणाले. "कसला अमूल्य वेळ नि काय? डॉक्टरचा वेळ झाला म्हणून काय तो सोन्याने बांधून काढलेला असतो थोडाच ! शिवाय मी ज्या वनस्पतीच्या शोधासाठी आलो आहे ती सापडण्यास अजून किती दिवस लागतील परमेश्वर जाणे !—बिचारा बरा झाला तर अनेकांचें मनरंजन करील !" शेवटचे वाक्य डॉक्टरनीं अर्धवट स्वगत आणि अर्धवट उघड असें म्हटलें.

" हा तुमचा पेशंट गवई आहे वाटतं?" वसुंधरेने सहज कुतुहलाने विचारले.

" गवई नाही; लेखक आहे तो !" डॉक्टर शांतपणे म्हणाले, " महाराष्ट्राचे लोकप्रिय कादंबरीकार रमेश—"

" कोण रमेश ?"—वसुंधरेच्या तोंडून हे उद्गार अचानक बाहेर पडले.

" होय रमेश ! तुम्ही ओळखतां वाटते त्याना !"

" ओळख म्हणजे ही अशीच त्यांच्या कादंबऱ्यावरून झालेली !-बरं पण ते कशानें आजारी आहेत ?"

डॉक्टर क्षणभर स्तब्ध राहिले. मग किंचित खालच्या स्वराने म्हणतात, " त्याच्या वर्तनात अलिकडे बराच स्वैरपणा शिरला होता. नीतिअनीतीच्या कल्पनाहि त्यांनीं जवळ जवळ गुंडाळून ठेविल्या होत्या. त्यामुळें एकदा जें त्यांचें वांकडें पाऊल पडले तें कायमचेंच ! अधोगतीच्या गर्तेत ते अधिकाधिक खोल जाऊं लागले. आणि याचा परिणाम म्हणजे आतां एका भयंकर स्पर्शजन्य रोगानें त्यांना पछाडलें आहे. त्याचे हाल आता कुत्र्यालाहि नकोतसे झाले आहेत. सदा पुढें पुढें करणारी आणि तोंडावर गोड गोड बोलणारी त्यांची सारी मित्रमंडळी त्यांना केव्हांच सोडून गेली. त्यांच्या सुखाला कारणीभूत होणारीं सारीं साधनें आजच्या स्थितींत त्यांना विषतुल्य वाटूं लागलीं आहेत. असहाय्य आणि दीन अशा अवस्थेंत ते माझ्याकडे आले. माझ्या हातून

होईल ती सारी खटपट करीन असें त्यांना मी वचन दिलें आहे. आपल्या कृत्याचा त्यांना पूर्ण पश्चात्ताप झालेला दिसतो. यातून जगलो वांचलों तर निर्मळ आयुष्य घालविण्याचा आपला बेत त्यानीं माझ्याशीं कितीदा तरी बोलून दाखविला. त्यांच्या एकंदर स्वभावावरून ते मुळचे सदाचारी असावेत याबद्दल मला बिलकूल संदेह वाटत नाहीं ! "

वसुंधरा निमूटपणें ऐकत होती. ती कसल्या तरी विचारात गर्क होऊन गेली होती.

बऱ्याच वेळानें ती म्हणाली, " मला त्याचा मुंबईचा सध्याचा पत्ता सांगाल का ? "

कुठल्याहि रोगी, अपंग माणसाविषयी तिला वाटणारी कळकळ आणि त्याची सेवा करण्यात दिसून येणारी तिची तत्परता हे तिचे दोन गुण साऱ्या गांवाला चांगलेच परिचित झाले होते. पण इतक्या दूरस्थ रोग्याविषयीं ती इतकी आस्था दाखवित असलेली पाहून डॉक्टरना क्षणभर आश्चर्य वाटल्यावाचून राहिले नाहीं.

" का हो, विचारातसे पडलात ? " डॉक्टर बोलत नाहींतसे पाहून वसुंधरेने विचारलें.

" त्याचा पत्ता समजून घेणें अगदीं आवश्यकच आहे का ? " डॉक्टरांनी विचारलें.

" होय ! " शांतपणे उत्तर आलें.

" तर मग ऐका, रमेश नूतें मुंबईत नसून इथे या पाटवडातच आहेत ! "

" डॉक्टर, तुम्ही थट्टा तर नाहीं आरंभलीत ? "

" भलत्याच गोष्टींत थट्टा करण्याची मला संवय नाहीं. हवापालट करण्यासाठीं व मघा सांगितल्याप्रमाणे मला पाहिजे असलेल्या वनस्पति इकडे सांपडल्यास तावडतोब औषधोपचार करण्यासाठी त्यांना मी येताना माझ्याबरोबर आणलं आहे. मात्र त्यांना गावांत आणणं अनेक दृष्टीनीं गैरसोईचें असल्यामुळें आणि विशेषतः रोग स्पर्शजन्य असल्यामुळें आपल्या महादू परटाच्या साहाय्यानें गांवाबाहेर त्यांची सारी सोय करण्यांत आली आहे. असल्या कामात महादूसारखा माणूस सांपडणें मात्र दुर्मिळ ! माझ्या तोंडून शब्द निघतांच त्यानें ती

जोखीम आनंदानें अंगावर घेतली. नाहींतर आमचे लोक! अशा रोग्याच्या वाऱ्यालाहि नाहीं उभे राहायचे!"

आणखी थोडया इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर डॉक्टर निघून गेले.

❀

कपडयांची मोजदाद करतां करतांच महादूने वर पाहिले. वसुंधरेला पहातांच तो अदबीनें उठून उभा राहिला.

"काय बाई आज गरीबाच्या घरीं—"

"महादू, तुला मी कितीकदां तरी सांगितलें आहे कीं गरीब आणि श्रीमंत हा भेद माझ्याकडे नाहीं. विशेषतः गरीबाकडे माझा जेवढा ओढा आहे तेवढा श्रीमंताकडे नाहीं."—

"तें काय आम्हाला सांगावयाला हवं का बाई! सारा गांव याची साक्ष देईल. पण आपलं कोणतं काम माझ्याकडून होण्यासारखं आहे तेवढं सांगा!"

"हे बघ, मुंबईहून ते पाहुणे आले आहेत ना? त्यांना भेटायला आले आहे मी!"

महादू विस्मयानें तिच्या तोंडाकडेच पहात उभा राहिला. आपण आतापर्यंत अगदीं गुप्त ठेवलेली बातमी वसुंधरेला कशी कळली यानेंच त्याला आश्चर्य वाटले.

आता अधिक लपवाछपवी करण्यांत काही अर्थ नाहीं हे जाणून तो तिला रमेशकडे घेऊन गेला.

पावलांची चाहूल लागतांच रमेशची नजर दाराकडे वळली. क्षणभर आपल्या डोळ्यांवर त्याचा विश्वासच बसेना! त्यानें डोळे ताणताणून पाहिलें. होय, ती वसुंधराच होती. ही आपल्याकडे का बरी आली? I told you so! अशाच वृत्तीनें ती आली आहे काय? मला हिणवावें, माझी निर्भत्सना करावी, हाच तिचा उद्देश असेल का? पण ही शंका फार वेळ मनात राहिली नाहीं. तिच्या, प्रसंगीं कर्तव्यनिष्ठुर होणाऱ्या अंतःकरणाखालीं प्रेमाचा अखंड झरा वाहत असतो ही जाणीव त्याच्या मनातून नाहींशी झाली नव्हती, इतकेंच नव्हे तर त्याच्यावर आलेल्या अनेक संकटपरंपरेंत ही एकच नाजूक जाणीव त्याला जगावेसें वाटण्यास कारणीभूत झाली होती.

" वसुंधरे, दूरच उभी रहा। जवळ येऊन आपला अमोलिक जीव धोक्यात घालूं नकोस ! "

" रमेश, हरघडी जीव धोक्यांत घालायला जे माणूस एका पायावर तयार असतें त्याच्याच जीवाला मौलिकता प्राप्त होते नाही का ? अशा प्रसंगी जर मी दूर दूर राहू लागलो तर माझ्या जीवाचे अमोलिकत्व क्षणार्धात नाहीसे होईल ! " तिच्या या वागणुकीने रमेशचे अंतःकरण भरून आलें. बराच वेळ त्याच्या तोंडातून शब्दच बाहेर फुटेना. त्याची ही स्थिति वसुंधरेच्या ध्यानीं यायला वेळ लागला नाहीं. ती मृदु स्वराने म्हणाली, "रमेश, एवढया कसल्या विचारात गुग झालात ? "

" वसुंधरे, तुझी क्षमा कशी आणि कोणत्या शब्दानी मागावी याचाच विचार चालला आहे ! "

" मग त्याबद्दल विचार करण्याचे बिलकूल कारण नाही. आपल्याला या दुखण्यातून बरे करण्याची हमी डॉक्टरनी आणि मी, दोघानी घेतली आहे. आपण बरे झाल्यावर मागातून हवा तर इतर गोष्टीचा विचार करू. आपल्याला पश्चात्ताप झाला आ॰ त्यात सर्व काही भरून आले. "

" वसुंधरे, माझा हा पश्चात्ताप खऱ्या जिव्हाळयाचा आहे. या दुखण्याला त्रासून जीवाचें काही तरी बरेवाईट करून घ्यावे हा विचार अनेकदा माझ्या मनात येऊन गेला. पण अशा रीतीने मरण्यापेक्षा यातून जरा डोकें वर होताच एखाद्या लोकोपयोगी कार्याला स्वतःला वाहून घ्यावे आणि ते कार्य करता करताच मृत्यू येऊन अंशतः तरी माझे पाप-क्षालन व्हावे याच एकमेव इच्छेने मी जगण्याचा प्रयत्न करीत आहे. वसुंधरे, तुझ्या व माझ्या परस्परविरुद्ध आचरणाने मी जर कोणता धडा शिकलो असेन तर हाच की, त्यागातच माणुसकी आहे ! भोगात नव्हे ! "

दोन उष्ण अश्रुबिंदू अंगावर पडल्याचा त्याला भास झाला. त्याची नजर वसुंधरेच्या नेत्रावर खिळली. अश्रुबिंदूच्या त्या उगमात आपल्या भावी आयुष्यांतील सारें चैतन्य ओतप्रोत भरलेले त्याला दिसून आले.



## हृदयांचा लपंडाव



आज तारा येणार म्हणून शांतेला आनंद झाला होता. पण तो आनंद निर्भेळ मात्र नव्हता. त्या आनंदाच्या अंतर्यामी कसली तरी भयसूचक भावना गुप्तपणें वास करीत होती. आणि ही गुप्त भावना ज्या ज्या वेळी आपलें डोकें वर काढी त्या त्या वेळीं शांतेचें मन अस्वस्थ होई. तिचा आनंद कोठल्या कोठे पार लोपून जाई आणि या भरात ही तारा न येईल तर बरें, असेंही तिला वाटे.

शांतेचें डॉक्टर माधवराव यांच्याशीं लग्न होऊन आज जवळ जवळ चार वर्षे झालीं होतीं. हीं चार वर्षे त्यांनीं अतिशय सुखात घालविलीं होतीं. शांतेवर डॉक्टरसाहेबांचे निरतिशय प्रेम होतें. तसें पाहिलें तर शांता रूपाने आपली अशीतशीच होती आणि शिक्षणही बेताबातानेच ! पण आपल्या प्रेमळ आणि गोड स्वभावाने तिनें माधवरावांना अगदी आपलेसें करून ठेविलें होतें. अशा रीतीनें या चार वर्षात त्यांना सुखाची वाण कधीच पडली नाही. नाही म्हणावयास एका गोष्टीची आठवण मात्र तिच्या मनाला मधून मधून त्रास देत असे. तिच्या लग्नापूर्वी माधवरावांचे लग्न तारेशीं—त्यांच्या मामाच्या मुलीशीं ठरलेलें होतें. माधवरावांच्या मनातूनही तारेशीं लग्न करावयाचें फार होतें. पण मध्यंतरी माधवरावांचे वडील व मामा यांच्यामध्यें काहीं वितुष्ट आल्यामुळें माधवरावांच्या वडिलांनीं रागारागानें त्या लग्नात मोडता घातला आणि मेहुण्याच्या नाकावर ‘ टिचून ’ त्यांनी शांतेला सून म्हणून घरात आणली. अर्थात् सुरवातीचे काहीं दिवस माधवरावांनीं मनाच्या अस्वस्थतेंत आणि उदासीनपणात घालविले. तारेवर त्यांचें प्रेम होतें कीं काय हें सांगता येणें कठीण आहे. तसें पाहिलें तर हा प्रश्न खुद्द त्यांचा त्यानाच अजून सुटलेला नव्हता. पण तारेसारखी सुंदर व सुशील मुलगी आपली पत्नी होणार ही भावना त्यांनीं आज बरेच दिवस मनाशीं बाळगिली होती. आणि याच भावनेला ते प्रेम असें समजत आले होते. अर्थात् या प्रेमनिराशेमुळें आपलें जीवित दुःखातच जाणार

असें त्यांना वाटलें. पण अनुभवानें त्यांची ही भीति निराधार ठरली. शांतेच्या प्रेमळ सहवासांत त्यांना हळूहळू तारेचा विसर पडत चालला आणि आतां तर तारा म्हणून आपली एक मामेबहीण आहे, या भावनेव्यतिरिक्त इतर साऱ्या गोष्टींची त्याच्या मनांतून हकालपट्टी झाली होती. आणि या प्रत्यक्ष अनुभवावरून तारेवरील आपलें प्रेम हें खरे प्रेम नसून तो नुसता प्रेमाभास होता अशी त्यानीं आपल्या मनाची आता समजूत करून घेतली होती.

खुल्या दिलाच्या माधवरावानीं ही गोष्ट मनमोकळेपणानें शातेच्या कानांवर घातली होती. आणि तिलाही आपला पति मनात काहींही आडपडदा न ठेवता साऱ्या गोष्टी आपल्याला सागतो म्हणून माधवरावांबद्दल एक प्रकारचा अभिमान उत्पन्न झाला होता.

दिवस अशा रीतीने जात असता एक दिवस तारेच्या वडिलानीं राम म्हटलें आणि त्यानंतर लवकरच माधवरावाना त्याच्या वडिलाकडून एक पत्र आले.–
" तुझ्या मामाच्या मृत्यूमुळे तुझ्या आईला फार दुःख झालें आहे. मलाही आता त्याच्याशीं विरोधी भावाने वागल्यामुळें पश्चाताप होत आहे; पण त्याला इलाज नाही.—तारा यंदां इग्रजी सातवींत गेली आहे. तुला माहितच आहे कीं, आपल्या गावातल्या शाळेंत मॅट्रिकचा क्लास नाहीं. आणि एवढें शिकल्यावर एका वर्षासाठीं तिच्या शिक्षणावर पाणी पडावे अशी तिच्या आईची व आमचीही इच्छा नाहीं. त्याना आमच्याशिवाय जवळचे असें दुसरें कोणी नाहीं हें तुला ठाऊकच आहे. म्हणून तिला शिक्षणासाठीं निदान मॅट्रिक होईपर्यंत तरी तुझ्याकडे ठेवावें असे आमच्या सर्वाच्या मनात आहे. तरी तुझें मत काय आहे ते कळव. " माधवरावानीं तें पत्र शातेला दाखविलें आणि दोघाच्याही समतीनें तारेला इकडे आणण्याचें ठरून त्याप्रमाणें पत्रही गेलें.

तारा आज यावयाची होती. आपली आज एक नवीन ओळख होणार आहे म्हणून शातेला आनंद झाला. पण वरील गोष्टीची तिला आठवण होताच तिच्या आनंदांत मधून मधून विरजण पडत असे. न जाणो, कालांतरानें बुजालेलें माधवरावाचे प्रेम तारेच्या सहवासानें पुनश्च जागृत झाले तर ! या विचारानें तिचें अंग किंचित् शहारल्यासारखें झालें. असा नुसता विचारसुद्धां मनांत आणणें म्हणजे कृतघ्नपणा पदरीं बाधून घेण्यासारखें आहे. इतक्या दिवसांच्या सहवासानें त्याच्या एकनिष्ठ प्रेमाची खात्री पटूनही आपण आतां अशा

तऱ्हेच्या विचाराला मनांत नुसता थारा देणें म्हणजे शुद्ध अधमपणाच होय असें तिला वाटलें. तिनें तो विचार झटक्यासरसा मनातून काढून टाकला आणि ती तारेची मार्गप्रतीक्षा करूं लागली.



तारेला येऊन दोन अडीच महिने होऊन गेले होते. तारेचा स्वभाव मनमिळाऊ असल्यामुळे शातेची आणि तिची गट्टी जमावयास फार वेळ लागला नाहीं. दोघींमधील परकीपणाचा भाव साफ नाहींसा होऊन त्या आता अगदी बहिणीबहिणीप्रमाणें वागूं लागल्या होत्या.

" पुरे झाला बाई आता अभ्यास तुझा ! भारीच अभ्यासू दिसतेस हो, तारे तूं ! कुठची तरी स्कॉलरशिप् उपटायचा बेत दिसतो आहे तुझा ! "

" इश्श ! आम्हांला कुठची मिळायला पडलीय् स्कॉलरशिप् ? मी म्हणतें नुसती पास झालें म्हणजे गंगेत घोडं न्हालं एकदाच ! इकडे राहून तुम्हा सर्वांना त्रास दिल्याचं सार्थक तरी होईल मग ! "

" बरीच कीं ग आहेस तूं, तारे ! आम्हाला काय तुझ्यापासून त्रास होतो होय ? हें अगदीं मनापासून बोललीस ना तूं, तारे ! "

" अय्याय्या ! आमच्या शातावहिनीला राग आला वाटतं ? मी आपलं सहज गमतीनं बोलले ते, वहिनी ! मी इकडे आल्यापासून तुम्हीं दोघं मला किती प्रेमानं वागविता तें काय मला दिसत नाहीं होय ? माझ्या अभ्यासांत व्यत्यय येऊं नये म्हणून घरांतल्या काडीलाही तुम्ही मला हात लावूं देत नाहीं. उलट केव्हां केव्हा माझीं स्वतःचीं कामेसुद्धा तूं करतेस ! मग अशानं मला जर एखादी स्कॉलरशिप् मिळाली तर त्यात आश्चर्य तें काय ? तशात माधवरावांनीं उद्यांपासून रोज मला थोडा वेळ शिकविण्याचं कबूल केलं आहे. मग कसली काळजी ? "

. शांता हंसली. पण तें हंसणें कांहीं मनापासून नव्हतें. तारेला माधवराव रोज थोडथोडें शिकविणार आहेत हें ऐकून तिला कसेंसेंच झालें. शिकविण्याच्या निमित्तानें कां होईना, पण दोघांनींही दररोज थोडा वेळ एकांतांत घालवावा हें तिला बरें वाटलें नाहीं. एवढी त्यांना शिकविण्याची हौस होती तर मला कां नाहीं बरं त्यांनीं शिकविलं ? निदान तुला शिकण्याची इच्छा आहे का म्हणून नुसती चौकशी तरी करायची होती ! पण—

" काय वहिनी, कसला विचार चालला आहे ? " बराच वेळ ती बोलत नाहीसे पाहून तारेने विचारले.

" विचार कसला !–हां, पण आज कुठं व्हिजिटला जायचं झाल आहे. यायला रात्र होईल म्हणून सागून पाठवलं आहे. चल, तुला वाढते जेवायला !"

" आणि तूं ! "

" मी ? " असे म्हणून शातेने किंचित् स्मित केलें. " आपली बसेन मागाहून ! " ती म्हणाली.

" समजल समजलं ! " तारा खोटसाळपणाने हंसून म्हणाली, " माधवरावांवाचून अन्नाचा घास आमच्या शातावहिनीच्या गळीं उतरावा तरी कसा ? असंच ना, वहिनी ? "

" हो असच ! मला हसतेस, पण माझ्या जागीं तू असतीस तर काय केलं असतस ? "

शातेच्या तोंडून हे शब्द बाहेर पडताच तारेने एकदम तिच्याकडे अशा काहीं नजरेने पाहिले की, कोठून हा भलताच प्रश्न विचारण्याची आपल्याला बुद्धि झाली असे तिला वाटले. तारेच्या त्या मुद्रेत अनेक भाव व्यतीत झालेले तिला दिसले ? तसे पाहिले तर आज तारा आपल्याच जागी असती. आणि मी–? तारेच्या बाबतीत आपल्या हातून काही अन्याय तर झाला नाही ना अशी तिला शका आली.

बराच वेळ दोघीही स्तब्ध होत्या.

" तारे, " शातेने तिचा एक हात आपल्या हातात घेऊन प्रेमळ स्वरानें म्हटलें. " नी तुला काहीं विचारलं तर मनमोकळेपणानं त्याचं उत्तर देशील ना ? "

" वहिनी, असं काय बरें विचारतेस ? तुझ्याशीं मी कधीं तरी लपंडाव खेळलें आहे का ?"

" तारे मला कळलं कीं. तुझ्या बाबांच्या मनातून तुला इकडे द्यायची होती. खरं ना हें ? "

" हो !"

" अन् तुझंही इकडच्यावर भारी प्रेम होतं म्हणे ! "

तारेनें मानेनें होकारार्थी उत्तर दिलें.

" तारे, तुझं याच्यावरील प्रेम अजूनही तसंच कायम आहे का ? " तारा कांहींच न बोलतां गप्प राहिली.

" तारे, बोलत कां नाहींस ? "

" वहिनी, तुला राग तर नाहींना येणार माझा ? "

" छे ! भलतंच ! "

" मग वहिनी, खरं सागायचं तर माधवरावाविषयींच्या माझ्या प्रेमात बिलकुल फरक झालेला नाही. उलट—"

" उलट तें उत्तरोत्तर वाढत चाललं आहे असंच ना ? "

तारेनें होकारार्थी मान हालविली.

एकाएकीं विजेचा झटका बसावा त्याप्रमाणें शांतेची स्थिति झाली. तिचा स्वभाव मत्सरी नव्हता. पण तारेच्या या बोलण्याचा तिला राग आल्याशिवाय राहिला नाहीं.

" वहिनी, " तारेने तिचे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन म्हटलें, "तुला मी सख्ख्या बहिणीपेक्षाहि अधिक जवळची मानते. तुझा आनंद तोच माझा आनंद असं मी समजते. मग मी जाणून बुजून तुझ्या सुखात कधींतरी माती कालवीन का ? तुझ्याकडे मी ही गोष्ट बोलून दाखविली असली, तरी माधवरावांना मात्र या गोष्टीचा मागमूसही लागू देत नाहीं. जशी कांहीं मी त्या गांवचीच नाहीं अशी मी त्याच्याशी वागते. तेही पण आता मागल्या सगळ्या गोष्टी विसरून गेल्यासारखे दिसतात. तूं माझ्यावर पूर्ण विश्वास ठेव. मी तुला कधींही फसविणार नाहीं. "



शांतेला त्या रात्रीं कांहीं केल्या झोंप येईना. तिच्या मनात विचारांचें काहूर माजून राहिले होतें. आपल्या पतीचा स्वभाव तिला माहित असूनही आणि तारेनें एवढें आश्वासन दिलें असतांही तिला कसली तरी भीति वाटूं लागली होती. मनुष्यस्वभाव आहे ! त्यांत कधीं काय फरक होईल हें कोणाला सांगतां येणार ? आज गोड गोड बोलणारी तारा उद्यां उलटणार नाहीं कशावरून ? आणि माधवरावाचें आज आपल्यावर कितीही प्रेम असलें तरी तारेसारख्या सुंदर व मोहक मुलीच्या सहवासांत तें तसेंच टिकून राहील याचा काय नेम ?

तारा यंदा नापास झाली तर आपल्या घरीं राहिल्यामुळे तिच्या अभ्यासाची आबाळ झाली असेंच तिच्या आईला वाटणार! तेव्हा हा दोष होता होईल तो आपल्यावर येऊ नये म्हणून माधवरावानीं अलीकडे तारेच्या अभ्यासाकडे विशेष लक्ष दिले होते. अर्थात् त्या मानाने त्याचे शातेकडे दुर्लक्ष होऊं लागले. याचा अर्थ ते तिच्याशीं फटकून वागूं लागले होते किंवा तिचा सहवास ते टाळीत होते असा नाही. पण—कावीळ झालेल्या माणसाला सारेच पिवळे दिसूं लागतें. शातेला आता माधवरावाच्या प्रत्येक कृतीत काही तरी हेतु असावा असे वाटूं लागले होते. नित्याच्या गोष्टी, पण त्या आज माधवराव मुद्दाम घडवून आणवीत असल्याचे तिला वाटत होते. तिच्या शंकित मनाला माधवरावांचें प्रेमाचे बोलसुद्धा अलिकडे नीरस वाटू लागले होते. दोघानाही एकांतांत मनसोक्त गोष्टी करावयास सापडाव्यात म्हणून हे अभ्यासाचे भूत त्यांनी आपल्या-पुढें उभे केलें असावे, असेही वाटण्यापर्यंत तिची मजल गेली. दोघांनींही सहज एकमेकाकडे पाहिले तरी त्यात काही भाव लपून राहिलेला असावा अशी ती आपल्या मनाची समजूत करून घेई. त्याच्या सहज संभाषणातहि तिला गूढार्थ भरून राहिलेला दिसे.

तिला हे असह्य झाले. त्या दिवशी ती खूप रडली. " मीच दुर्दैवी! मी त्या दोघांच्या सुखाच्या आड आले. तारेवर त्याचे प्रेम आहे. तारेचंही त्यांच्या-वर आहे. मग माझीच कशाला मध्ये लुडबुड? माझा त्याना त्रास होत असेल! माझ्यापासून त्याना अडथळाही होत असेल! हा माझा कांटा मध्ये नसता तर! असाही विचार त्याच्या मनात येत असेल! ही गोष्ट मला अगोदर कळती तर! पण आता हळहळून काय उपयोग?"

तिचें मन काहीं केल्या शात होण्याचें चिन्ह दिसेना. तेथे राहाण्यात तिला एक प्रकारचा जाच होऊं लागला. ' यापेक्षा दोन महिने कुठ तरी मैत्रिणीकडे जाऊन राहिलं तर मनाला थोडा तरी विरंगुळा वाटेल; पण मग त्याना सारं रान मोकळं करून दिल्यासारखं होईल, त्याची काय वाट?–घालू दे, त्याना खुशाल धागडधिंगा घालूं दे? समुद्राला बांध कसा घालणार? आकाशाला ठिगळ कोण लावणार? त्याच्या मनांतील भाव तरी स्पष्ट होतील.'

त्याच दिवशीं तिनें मैत्रिणीकडे जाण्याची गोष्ट माधवारावांच्याकडे काढली. ' माधवराव पहिल्यानें थोडे आढेवेढे घेतील. जाऊ नको म्हणतील, निदान

वरवर तरी आपल्याला वाईट वाटत असल्याचे दाखवितील ! पण अशा सोंगानें मी थोडीच फसणार ! '

पण त्यापैकीं कांहींच घडून आलें नाहीं.

" शाते, मीच तुला सुचविणार होतो. अलिकडे तुझी तब्यत ठीक दिसत नाहीं. कुठं तरी दोन दिवस हवेवर जाशील तर बर, असं मला वाटत होत. बेबी तुझी जीवाभावाची मैत्रीण आहे. ती तुला काहीमुद्धा कमी पडूं देणार नाही. "

शातेनें आपल्या वरच्या दातानी खालचा ओठ घट्ट दाबून धरला. " एकूण आपल्या वाटेंतला माझा काटा दूर होण्याची वाटच पाहात होती स्वारी. " ती मनांतल्या मनात पुटपुटली.



शांतेची मैत्रिण बेबी ही मालवणला राहत असे. तिचे वडील कस्टमात नोकरीला होते. मालवणला जावयाचे म्हणजे गोवा लाईनच्या बोटीने प्रवास करावा लागत असे.

शातेची बोट रत्नागिरी बदरात नुकतीच आली होती. बदराची शोभा पाहण्यासाठीं शांता बोटीच्या कठड्याला धरून उभी होती. उतारू लोकाची सारखी धडपड आणि आरडाओरड चालू होती. वर येणारे इसम जागा सापडेल तिकडे हळूच आपली पथारी सोडून देत होते. तेवढया त्या आकुंचित जागेत आपल्या मंडळीचा समावेश होईल किंवा नाही याचा विचार करण्याचा ते त्रास घेत नव्हते. विचार करावयाला वेळ होताच कोठे मुळीं ?

शातेच्या खाद्यावर हळूच कोणी तरी हात ठेविला. मागे वळून पाहाते तो " अय्योय्यो ! ताईसाहेब ! आपण कुणीकडे इकडे ? " हे बेबीचे शब्द तिच्या कानावर आदळले.

" कोण, बेबी ! अन् तूं कुठं इकडे ? " शातेने आश्चर्यानें विचारलें.

" कुठं म्हणजे ? या महिन्यापासून बाबांची बदली रत्नागिरीला झाली आहे. गेल्याच आठवड्यात आम्ही इकडे आलो. तुला पत्र घालणार होतें; पण आज उद्यां करतां करता राहूनच गेलं ! आज बाबाबरोबर सहज आपली मौज पाहावयाला आलें होतें बोटीवरची । "

" बरं झालं बाई तूं भेटलीस तें ! नाहीं तर तूं मालवणलाच आहेस असं

समजून मी मालवणलाच गेले असते. मी येणार असल्याची वर्दी देणारं एक पत्रही मी पाठविलं होतं तुला ! ”

“ मग तें मालवणहून रत्नागिरीला येईल सावकाश. ” बेबी हंसूं लागली. शांताही हंसली.

दुसरे दिवशीं सकाळी शांता आणि बेबी ओटीवर चकाव्या पिटीत बसल्या होत्या. दोघीही गोष्टीच्या एन रंगात आल्या होत्या. इतक्यात बेबीचे वडील हातात एक तार घेऊन तेथे आले.

“ बेबी, तुझ्या मैत्रिणीचं नशीब बलवत्तर दिसतं ! देवानं खैरच केली म्हणावयाची ! कालच्या याच्या बोटीनं विजयदुर्ग आणि देवगड यामध्यें कुठंशी सगळ्या उतारूंसह जलसमाधि घेतली म्हणं ! ही बघ आतांच तार आली आहे. ”

“ म्हणजे उतारूंपैकीं कुणीच वाचलं नाही की काय ? ” बेबीने विचारलें.

“ छे ग ! माणसाना वाचविण्याइतका अवधिच मिळाला नाही. भयंकरच वादळ झालं म्हणे रात्री ! ”

“ खरच, शांताताई, तुझ्या आयुष्याची दोरी बळकट होती म्हणूनच मला बोटीवर बाबाबरोबर यण्याची बुद्धि झाली. आता एक सविस्तर हकिकतीचं पत्र लिहून—“ तिकडच्या ” कानांवर हे वर्तमान घाल. नाही तर उगीच बसायचे काळजी करीत ! ”

“ खरंच, बाई ! ” असे म्हणून शांता उठली आणि खोलीत गेली.

पत्राच्या दोनचार ओळी लिहून झाल्या असतील नसतील तोंच एकाएकीं तिचा हात आखडला. कसला तरी चमत्कारिक विचार तिच्या मनात चमकून गेल्यामुळे ती स्तब्ध राहिली. “नाहीच पत्र लिहिलं तर ! हो, समजतील कीं इतर जीवांबरोबर शांतेनेही जलसमाधि घेतली म्हणून ! वाईट वाटेल ? वाटेल थोडंसं ! इतक्या दिवसाचा निकट सहवास ! मग थोडंसं दुःख झालं तर त्यात नवल तें काय ? पण ते खात्रीने मला लवकरच विसरून जातील. आपल्या मार्गातील ही धोंड अनायासं नाहींशी झालेली पाहून त्याना मनातून आनंदही होईल. माझ्या-पासून आता त्याना सुख मिळणं शक्य दिसत नाही. मग त्यांनीं आपला सारा जन्म मनाच्या कोंडमाऱ्यांत घालविण्यापेक्षा माझंच काय होईल तें होईल ! माझ्या एकटीच्या सुखाच्या बलिदानानं जर दोन जीव जन्माचे सुखी होत

असतील तर तेवढं पुण्य मी का संपादन करू नये ? हो, असच ! पण मग बेबीला काय सांगायचं ? इथं किती दिवस राहायचं आणि मग कुठं जायचं ?"

मनुष्याच्या स्वभावाची हीच गम्मत आहे कीं, उत्साहातिरेकाने त्याने कोणतीही एखादी गोष्ट करण्याचे मनात आणले कीं, मग पुढे आलेले संकटांचे पर्वतही तो सहज लीलेने ओलांडून जातो. माधवरावाच्या सुखासाठी आपण केवढा स्वार्थत्याग करण्यास तयार झालो आहो या विचाराने शांतेच्या मनात उत्साहानें संचार केला होता. वाटेल त्या संकटाला तोंड द्यावयाला ती आता तयार झाली होती.

शांतेला इकडे येऊन एक महिना होत आला होता. आता इकडून होता होईल तो लवकरच कूच करावे हे उत्तम ! पण जावे कोठे हा प्रश्न दत्त म्हणून तिच्यापुढे उभा राहिला. आरवलीच्या मुलींच्या शाळेत एका शिवणकला शिकविणाऱ्या बाईची गरज असल्याचे तिनें त्या दिवसाच्या वर्तमानपत्रात वाचलें होते; पण बेबीला कसें चकवावें हा विचार तिला त्रास देऊ लागला. पण दैवयोगाने हेंही कोडें आपोआपच उलगडलें.

" जळो ही कस्टमची नोकरी ! आज रामेश्वराला तर उद्या कन्याकुमारीला. बरं, नाही म्हणायची काहीं सोय नाही ?" बेबी बडबडत होती.

" काय झालं, बेबी ?" शांतेनें उत्सुकतेने विचारले.

" अग, इकडे येऊन पुरता महिना होतो न होतो तोंच पुन्हा झाली आमची कारवारला उचलबांगडी. आता उद्या इकडून निघालंच पाहिजे. तू विश्रांतीला म्हणून चार दिवस आलीस; पण–"

" वा ग वा ! महिनाभर विश्रांति काय थोडी झाली का ग, बेबी ? अन् शिवाय आजच मलाही पत्र आलं आहे की, उत्तर हिंदुस्थानातल्या कुठल्याशा संस्थानांत तिकडची खास नेमणूक झाली आहे म्हणून ! मग मला तरी कसं राहाता येईल अधिक दिवस ? तुम्ही उद्या गेलात की, मी परवा निघालेच !" असें म्हणून शांता हसूं लागली.



आरवलीस शिवणकामाची शिक्षकीण म्हणून राहिल्यास शांतेला आतां जवळ जवळ दोन वर्षे होत आलीं होतीं. माधवराव व तारा हीं सुखात आहेत–

असावींत या कल्पनेनेंच तिनें हे इतके दिवस काढले होते. आणि या कल्पनेवर ती आणखी कित्येक दिवस काढावयाला तयार होती. पण एकवार तीं दोघें सुखांत असलेलीं डोळ्यानी पाहावी अशी तिला अलीकडे उत्कट इच्छा होऊ लागली होती. तीं आनदात असल्याची एकदां खात्री झाली कीं, मग आपला सारा जन्म असाच अज्ञातवासात गेला तरी त्याची पर्वा नाहीं असें तिला वाटूं लागलें. नाहीं होय करता करता शेवटी एकदा मनाचा पक्का धडा करून ही इच्छा तृप्त करून घेण्याचें तिने ठरविलें आणि काहीं दिवसांची रजा काढून ती एक दिवस मुबईस जाण्यास निघाली. मुबईत पाऊल टाकीपर्यंत तिला काहीं विशेष वाटले नाही; पण नतर मात्र तिच्या छातीत धडधडूं लागलें. आपल्यासाठी दैवाने काय ताट वाढून ठेवले असेल कोण जाणे. आणि आपले पति— ते आनदात असतील, कीं माझी त्याना आठवण होऊन दुःख होत असेल ! पण लगेच या शेवटच्या विचाराने तिचे तिलाच हसूं येऊं लागले. किती वेडगळ विचार आपल्या मनात आला हा ! तारेच्या गोड सगतींत त्याना मागची आठवण आतां कमची होते ! आणि त्यात आणखी अपत्यसुखाची भर पडली असल्यास— शांतेला कसेसेच झाले. उगीच मी मुंबईस आले, असेहि क्षणमात्र तिला वाटलें. ही तारेची ब्याद नसती तर आज आपण सुखाच्या अत्युच्च शिखरावर आरूढ झालो असतो असाही ओझरता विचार तिच्या मनाला चाटून गेला.

मुबईस ती + + गृहांत उतरली होती. येथून माधवराव राहत असलेली जागा फारशी लाब नव्हती. पण असे असूनही तिला त्या बाजूला फिरकण्याचा मुळींच धीर झाला नव्हता. तिने स्वतःला आपल्या खोलींत कोंडूनच घेतले होते असें म्हटले तरी चालेल. कामाशिवाय ती होता होईल तो खोलीबाहेर पडण्याचें टाळीत असे. न जाणो कोणी ओळखीचा भेटला तर ! सारेच ऑफस् व्हावयाचें !

हा हा म्हणता आठ दिवस कधीच निघून गेले. तरी आपला बेत कसा व कधीं तडीस न्यावयाचा याबद्दल शांतेचा विचार अद्याप चालूच होता.

त्या दिवशीं पाऊस फारच लागत होता. बसून बसून अगदींच कंटाळा आल्यामुळें पावसाची मौज पाहण्यासाठीं ती थोडा वेळ बाहेर येऊन उभी राहिली. इतक्यांत "तारे, अग तारे, अहो ताराबाईसाहेब, अशा भिजतां कां पावसांत ? वर या कीं !" हे शब्द तिच्या कर्णपथावर आदळले. शेजारच्या खोलींतील एक मुलगी, पावसाचा मारा चुकविण्यासाठीं अंग चोरून समोरच्या

घराच्या छपराखालीं आडोशाला उभ्या राहिलेल्या दुसऱ्या एका मुलीस संबोधून बोलत होती. काहींशा भीतीने आणि काहींशा औत्सुक्याने शांतेनें खालीं पाहिले. तिनें तारेला चटकन् ओळखलें. तारा वर येत होती. आपल्याला तिनें पाहिलें तर नसेल ना अशी शंका तिच्या मनात आली. पण अधिक विचार करण्यांत वेळ न घालविता ती चटकन् खोलीत शिरली आणि तिने दाराला आंतून कडी लावून घेतली.

पाऊस साफ ओसरल्यावर बऱ्याच वेळानें तिनें भीत भीत खोलींचे दार उघडलें. मघांची मुलगी बाहेर एकटीच उभी होती. " ही तारेची कोणीतरी चांगलीच मैत्रीण दिसते. " ती मनात पुटपुटली. हिच्याकडून जर तारेबद्दलची सारी बातमी आपल्याला कळली तर आपले केवढे तरी काम होईल असे तिला वाटलें पण तिला विचारावे कसे याचा तिला विचार पडला. इतक्यात ती मुलगी हळूहळू आपल्याकडेच येत असल्याचे तिला दिसले.

" आतां एक मुलगी माझ्याकडे आली होती. पाहिलीत का तुम्हीं ? " तिनें विचारलें.

" नाहीं–होय–पण तिचा चेहरा मात्र मला नीटसा दिसला नाहीं. कोण ती ? " शांतेनें चांचरत चाचरत विचारलें.

" ती माझी मैत्रीण तारा. ती इकडे शांतानिवासमध्ये राहते. आम्हीं दोघीही एकाच कॉलेजात असतो. ती म्हणत होती कीं आता इकडे उभ्या असलेल्या बाईचा चेहरा ओळखीचा वाटतो म्हणून ! पण इकडे तर तुमच्या-शिवाय दुसरं कुणीच उभं नव्हतं ! " इतके बोलून ती गप्प राहिली.

" मला वाटतं तिची काहीं तरी बघण्यात चूक झाली असावी. शिवाय या मुंबईत कधीं कधीं बरेचसे चेहरे आपल्या ओळखीचे वाटतात खरे; पण ती आपली आपण दिशाभूल करून घेतलेली असते. "

ती मुलगी तारेविषयीं आणखी कांहीं माहिती सांगेल या अपेक्षेनें शांतेनें बराच वेळ वाट पाहिली. पण शेवटीं आपण होऊन ती काहीं सांगत नसल्याचें पाहून तिनें हळूच विचारलें.

" तिचा नवरा काय करतो ? "

" तिचा नवरा ? " ती मुलगी किंचित् आश्चर्यानें म्हणाली. " तिचं लग्नच कुठं झालंय् ? "

" म्हणजे ? तिनं अजून लग्न केलंच नाहीं कीं काय ?"

" नाहीं. पण त्यात तुम्हाला एवढ आश्चर्य वाटण्याजोगं काय आहे ? तिचं शिक्षण संपल्याशिवाय ती लग्नाचा विचारसुद्धा मनात आणीलसं दिसत नाहीं."

" तिच्या घरी आणखी कोण मंडळी आहे ?" शांतेने अधीरतेनें विचारलें.

" ती आणि तिची आई. दुसरं कुणी नाही. तिची आई पण फार प्रेमळ स्वभावाची आहे हां !"

तिच्या बोलण्यात माधवरावाचा उल्लेख मुळींच न आलेला पाहून तिला फारच नवल वाटू लागलें. माधवरावाविषयी ही काहीच बोलत नाहीं हे आहे तरी काय ? ते इथे नाहीत तर गेले तरी कुठे ? त्यानी तारेशीं लग्न का केलं नाहीं ? कदाचित् तिचे शिक्षण संपल्यावरच तिच्याशीं लग्न करण्याचा त्याचा विचार असेल ! हे व अशासारखे अनेक विचार तिच्या मनात धुमाकूळ घालूं लागले. तिची उत्सुकता प्रतिक्षणी वाढू लागली. " कोण देईल मला या प्रश्नाचीं उत्तरें ?"

" काय हो, ही तारा श्रीमताची मुलगी आहे वाटतं ? हो, कारण आजकाल मध्यम स्थितीतल्या लोकाना कॉलेजचे शिक्षण म्हणजे—"

" पांढरा हत्ती होऊन बसला आहे." त्या मुलीने वाक्य पुरें केलें. " खरें आहे तुमचं म्हणणं," ती पुढें म्हणाली. " पण तारा ही श्रीमंताची मुलगी नाहीं. तिचा खर्च तिचे एक नातलग-डॉक्टर माधवरावच हे चालवीत असतात."

" कुठ असतात हे डॉक्टर ? इथच का ?" आपला बाण लागू पडलेला पाहून तिने एकदम विचारलें. आणि सगळ्या शरीराचे कान करून ती उत्तराची वाट पाहू लागली.

" डॉक्टर पूर्वी इथच होते. त्याचं लग्नही झालेलं होतं. पत्नीला तर ते अगदीं जीव की प्राण करीत असत म्हणे ! पण तिच्या मृत्यूनंतर काही दिवस त्यांची स्थिति अगदीं वेड्यासारखी झाली होती. जेवणखाणसुद्धा त्यानीं थोडे दिवस वर्ज्य केलं होतं. शेवटी त्यानीं मुंबईला रामराम ठोकला. आता कुठल्याशा एका गावांत पत्नीच्या स्मरणार्थ एक लहानसे इस्पितळ बाधून त्या ठिकाणीं गोरगरीबांना मोफत औषधोपचार करीत असतात."

" सुशे, ए सुशे, खोलीचं दार सताड उघडं ठेवून गेली तरी कुठं बाई ही ?—वाग वा ! मी तिकडे तुला किती हाका मारल्या आणि तूं तर इकडे

गप्पागोष्टींत चूर होऊन गेली आहेस!—ही मी मघां तुझी छत्री घेऊन गेलें होतें ना? ती घे आपली! मेनी मेनी थॅंक्स!"

"तारे! तारे!!"

तारेनें दचकून मागे पाहिलें. "कोण शांतावहिनी?" तारेला वाटलं आपण स्वप्नांत तर नाहीं ना? ती टकमक तिच्याकडे पाहातच राहिली.

शांतेनें एकदम पुढे होऊन तिच्या हाताला धरलं आणि तिला घेऊन ती आपल्या खोलींत गेली.

"तारे, तारे, मला क्षमा कर. मी तुमची महान् अपराधी आहे. तिकडच सत्त्व पाहण्यास गेले, पण त्यात मीच हरले." असं म्हणून शांतेने जाताना बोटीवर प्रथम पाऊल ठेवल्यापासून तो आतापर्यंतची सारी इत्थभूत हकीकत तिला निवेदन केली.

"शांतावहिनी, केवढा अविचार केलास हा! माझ्याबद्दल मला मुळीच वाईट वाटत नाहीं. पण तुझ्या या वेडपणामुळ त्याना मात्र भरपूर त्रास सोसावा लागला. पहिल्यानं त्याचा या बातमीवर विश्वासच बसेना. पण मग मात्र त्याना सारखा तुझा ध्यास लागला होता. आणि याचा परिणाम त्याच्या प्रकृतीवर होऊन ते नंतर बरेच दिवस आजारी होते. माझ्या हातून होईल तितके करून त्या आजारात त्याची मी सेवा केली. कित्येक दिवस तर मला झोपेशिवाय घालवावे लागत असत—"

"तारे, हे तुझे उपकार कसे ग फेडूं?"

"वहिनी, हे काय तुला उपकार का वाटतात? खरं सांगायचं म्हणजे त्या आजारांत त्यांची शुश्रूषा करताना मला कल्पनातीत आनंद होत असे. मला त्यापासून थोडासुद्धां त्रास झाला नाहीं. ते चागले बरे झाल्यावर माझ्या आईचं त्यांच्या वडिलांच्या संमतीनं त्याना एक पत्र आलं होतं. त्यांत "झाल्या गोष्टी विसरून तारेशीं आता नवीन संसार थाटावा" अशा अर्थाचा मजकूर होता. त्या दिवशीं रात्रीं घरांतील सर्व कामकाज आटोपल्यावर त्यांनीं मला हांक मारली. शांतपणानें ते म्हणाले, "तारे, हें तुझ्या आईचं पत्र वाच. माझ्या मनः-स्थितीबद्दल तुला अधिक कांहीं सांगितलं पाहिजे असं नाहीं. त्याची तुला पूर्ण

कल्पना आहे. माझ्या शांतेचा विसर मला या जन्मात तरी पडेल असं वाटत नाही. पण तुझ्याकडे पाहिलं की, इकडे आड अन् तिकडे विहीर अशी स्थिती होऊन जाते. केवळ माझ्याकरिता तू आतापर्यंत सोसलेला त्रास, माझ्या आजारात तू आपल्या जीवाची पर्वा न करता केलेली शुश्रूषा, सुरवातीपासून तो आतापर्यंतचे तुझं अकृत्रिम व एकनिष्ठ प्रेम या सर्व गोष्टी डोळ्यांसमोर उभ्या राहिल्या म्हणजे तुझ्या आईच्या पत्राला मान न देणं म्हणजे कृतघ्नपणाची सीमाच होय असं मला वाटू लागतं. तारे, मी माणुसकीला आजच काही तिलांजली दिलेली नाही. तुझ्याशी संसार थाटण्यास मी कबूल आहे." इतकें बोलून ते माझ्या उत्तराची वाट पाहू लागले.

"शांतावहिनी, अनेक वर्षे उराशी बाळगून ठेवलेली माझी आशा फलद्रूप होण्याची ती वेळ होती. मी हो म्हणाले असते तर मला या पृथ्वीवर स्वर्ग आणता आला असता. पण मी पाहिलं की, ते माझ्याशी विवाहबद्ध होण्यास तयार झाले ते केवळ कर्तव्य म्हणून! माझ्याकडे त्या वेळीं त्यांची पाहण्याची दृष्टि सहानुभूतीची होती-प्रेमाची नव्हती. ती परिस्थितीची हाक होती-हृदयाची नव्हती. त्यांच्या अंतःप्रेरणेच्या विरुद्ध त्यांना वागावयास लावण्याचे माझ्या जीवावर आले. आणि शेवटीं मी त्यांच्या म्हणण्याला मुळीच कबूल नसल्याचे सांगितले."

"त्यांनीं सर्व काही जाणले. पण त्याला इलाज नव्हता."

"लगेच त्यांनी मुंबई सोडली. आज त्यांनी नागपूरात ×× गांवी मोफत रुग्णालय उघडले आहे. गोरगरीबांची सेवा करण्यात ते आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता समजत असतात."

शांतेच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा चालल्या होत्या. "तारे, मला या वेळीं पंख असते तर आताच्या आता अशीच उठून तिकडच्या भेटीला गेले असते-पण तारे, मला ते क्षमा करतील का ग?"

"क्षमा?" तारेने तिला जवळ ओढून म्हटलें, "वेडी आहेस तूं वहिनी!" तिचेही डोळे आता पाण्याने डबडबून आले होते.



## प्रतारणा !



" मग याल ना उद्या आमच्याकडे जेवायला ?" सुधाताईंचा हात माझ्या हातात घेऊन मी त्याना प्रेमळपणाने विचारले.

" नका, मालतीबाई, मला असा आग्रह करूं नका ! सागितल ना तुम्हाला कीं, अगदीं कामाशिवाय मी कुठे म्हणजे कुठेंच जात नसते म्हणून ! मालती-बाई, तुमच्या प्रेमळ हृदयाची मला जाणीव आहे. पण तुमच्या या प्रेमाच्या भाराखालीं मला दडपून नका टाकूं गडे ! आधीच तुमचे माझ्यावर अनंत उपकार—" बोलता बोलता सुधाताईंच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले.

—आणि हें सदा असेच चालत असे. जरा कुणी प्रेमाने चार शब्द बोलले कीं हिचे आपले डोळे डबडबून यायचे ! साध्यासुध्या चालचलाऊ गोष्टीलासुद्धा ती उपकाराचें स्वरूप आणी. तिची मुद्राच इतकी करुण दिसे की पाहणाराचे अंतःकरण कळवळून आल्याखेरीज राहत नसे.

आमच्या घरातील मुलीना शिवणकाम शिकवायला आम्ही तिला ठेवली होती. असे काहीं फार दिवस झाले नव्हते तिला आमच्याकडे नोकरीला लागून; पण तेवढया त्या अल्पावधीत तिने आमचीं सर्वाची अंतःकरणे आपलींशी करून टाकलीं होतीं. मला तर ती अगदी सख्या बहिणीप्रमाणे वाटत असे.

मला राहून राहून आश्चर्य वाटे म्हणजे हेंच कीं, इतकी प्रेमळ, इतकी सुदर आणि इतक्या गोड स्वभावाची बायको ज्याला टाकून देण्याची बुद्धि झाली त्या तिच्या नवऱ्याच्या हृदयाला उपमा तरी कशाची द्यावयाची ? सुधाताईंत मला एकही दोष दिसत नव्हता. मग तिच्या या स्थितीला कारण तरी काय झाले असावें हें कोडे मला सुटत नव्हते. माझी पक्की खात्री होती कीं मी तिला विचारलें तर ती माझ्याकडे सगळे काहीं ओकून टाकील व आपलें दुःख आपल्यासारख्याच दुसऱ्या एका प्रेमळ हृदयाजवळ ओकून टाकलें म्हणजे मनाला किती हलकें वाटते याची मलाहि कल्पना होती. पण न जाणो कदाचित्

पूर्वस्मृतीमुळें सुप्तावस्थेंत असलेलें तिचें दुःख जोरानें उसळी मारून बाहेर यावयाचें आणि मनस्ताप वाढावयाचा !

त्या दिवशीं सुधाताई नि मी अशा दोघीच खोलींत होतो. बाहेर कुणीतरी 'यशवंता'च्या खालील ओळी सुरावर म्हणत होतें.

**' दुर्दैवें मम भूतकाळ कळुनी येतां तुम्हां आजला**
**केसें लोटुनि दूर दूर सुहृदा देतां मला एकला**
**आहे पंकज का म्हणून कमळा देती कुणी त्यागुनी ?**
**कां सद्यस्थिति पाहतां निरखुनी त्या भूत काळांतुनी ?'**

दोन उष्ण अश्रुबिंदू टपकन् माझ्या हातावर पडले. मी सुधाताईकडे पाहिलें. ती रडत होती.

" सुधाताई, तुम्ही वेड्या तर नाहीं ? "

" मालतीबाई, मी जर वेडी झालें असतें तर फार बरं झालं असतं हो ! वेडीच्या भावना—तिच्या हृदयावरील तरंग मेलेले असतात. तिच्या दुःखाची तिला जाणीवदेखील होत नसते. पण माझ्यासारख्या शुद्धबुद्ध असलेल्या माणसाच्या भावना अगदीं हळुवार झालेल्या असतात. सहानुभूतीच्या मंद झुळकीनेहि त्या कंपित होतात. आणि जीव अगदीं नकोसा होऊन जातो. "

" पण सुधाताई, अशानें तुमच्या जीवाला जास्त त्रास नाहीं का व्हायचा ? —सुधाताई, तुमच्या दुःखाचा भार हलका करण्यास माझा काहीं उपयोग होण्यासारखा आहे का ? "

" वेड्या आहात तुम्ही मालतीबाई ! माझं सारं दुःख माझ्या जीविता-बरोबरच नष्ट होणारं आहे. त्यापूर्वी कोणी कितीहि प्रयत्न केले तरी त्याचा फारसा उपयोग होण्याची आशा नको ! "

सुधाताईची हकिकत समजून घेण्याची ही संधि मी साधली. हलकें हलकें तिच्या पोटात शिरून मी तिच्या दुःखाचें कारण तिच्याकडून वदवून घेतलें. तें तिच्याच शब्दात सांगितलें म्हणजे बरें !

" मालतीबाई, त्यावेळीं मी ऐन तारुण्यांत होतें. देवाच्या दयेनं म्हणा अगर दैवाच्या कोपानें म्हणा माझी नेहमीं सुंदर मुलींत गणना केली जात असे. आईबापांची मी फार लाडकी ! पण या लाडाचा परिणाम असा झाला कीं, त्यांनी मला मोकाट वावरूं दिलं. ज्या वयांत आईबापांनीं डोळ्यांत तेल घालून

मुलीच्या सद्गुणसंवर्धनाकडे लक्ष द्यावयाचें त्याच वयांत माझ्या बाबतींत डोळेझांक व्हावयास लागली. मी माझ्या अनेक मैत्रिणीकडे प्रथम प्रथम अभ्यासाच्या निमित्तानें, पण मग केवळ चैनींत व स्वतंत्रतेंत वेळ घालवावयास मिळावा म्हणून वारंवार जाऊं लागले. केव्हा केव्हा तर दिवसाचा बहुतेक वेळ माझ्या एका खास मैत्रिणीकडेच मी घालवूं लागले. फक्त जेवणापुरतं घरी यावयाचं आणि अभ्यासाचें निमित्त करून सगळा वेळ तिच्या घरीं घालवायचा ! त्या मैत्रिणीला एक भाऊ होता. मझ्याशीं तर तो फारच गोडीगुलाबीनं वागायचा ! मालतीबाई, माझं सगळं रामायण सांगून तुम्हाला कंटाळा आणीत नाहीं. एवढेंच सागतें, कीं, त्याने एक दिवस माझ्या अल्लडपणाचा फायदा घेतला. आणि मग माझ्या आईबापाचे डोळे उघडले. माझे शाळेतून नाव काढून टाकण्यांत आले. .कुणाचकडे जाण्याची मला कडक बंदी करण्यात आली. गांवांत माझ्या नांवाची चर्चा होऊं लागली.

" लगबग करून अगदीं दूर अशा ठिकाणचें एक स्थळ पाहून माझा लग्न-सोहळा उरकून घेण्यात आला.

"माझे ग्रह अजूनहि उच्चीचे होते. म्हणूनच माझ्या संसारातील संवगडी मला अगदीं मनासारखा मिळाला. त्याच्या प्रेमळ सहवासात हळुहळु मी मागचें सारें विसरून गेले. माझ्या मागच्या कृत्याचा तर मला केव्हाच पश्चात्ताप झालेला होता.

"पण एक मात्र होऊं लागलें. जखम भरून निघाली तरी व्रण मात्र कायमच राहतो. माझ्या कृत्याचा जरी मला पूर्ण पश्चात्ताप झाला होता तरी मी पापी आहे ही जाणीव कांही केल्या अंतःकरणांतून जाईना ! आणि त्याहीपेक्षा विशेष म्हणजे हें कीं, एका निष्पाप, सरलहृदयी आणि प्रेमळ मनुष्याला मी फसवीत तर नाहीं ना ? हा विचार अष्टौप्रहर मला चैन पडूं देईना ! मी अगदी पवित्र आहें ही माझ्याविषयीं त्याची असलेली स्वाभाविक कल्पना ज्या ज्या वेळी माझ्या प्रत्ययास येई त्या त्या वेळीं अंतःकरणात कसं अगदीं कालवल्यासारखं होई. एकदा वाटे आपल्या जीवाच्या जोडीदाराकडे सर्व काहीं मोकळ्या मनानें सागून टाकावं आणि मोकळं व्हावं एकदाचें ! पण परत वाटे, न जाणो, माझ्या कबुलीजबाबामुळें आतांच्या आमच्या स्वर्गीय

मुखांत माती कालवली गेली तर ! त्यांचं मन माझ्याविषयी कलुषित होऊन माझ्यावरील त्यांच्या प्रेमाला ओहोटी लागली तर !—

" अखेर तो विचार मी सोडूनच दिला.

" कधीं कधी सत्य हे कल्पित कथेहूनही अधिक चमत्कृतिजनक असतं असं म्हणतात तें खोटं नाहीं. एखाद्याचा सहवास जो जो अधिकाधिक होत जातो, तो तो त्याच्या भावनाच्या गुंतागुंतींची आपल्याला अधिकाधिक जाणीव होऊं लागते. माझेहि असेच झाले. अलिकडे अलिकडे त्याच्या हंसतमुखाआड लपलेली उदासीनतेची छाया माझ्या सूक्ष्म नजरेला दिसून येऊं लागली. त्याच्या हास्यात नैराश्य आणि वागणुकींत आर्जवीपणा दिसून येऊं लागला. प्रथम प्रथम मला वाटल की माझ्या कृत्याचा इतिहास तर कुणी त्यांच्या कानावर घातला नसेल ना ? पण छे ! तसं असतं तर त्याच्या भावना इतक्या मृदुलतर न होता कठोर झाल्या असत्या. त्याच्या वर्तणुकीत अधिकाधिक बेछूटपणा येत गेला असता ! मग हे अस का व्हाव ?

" त्या दिवशी ते नेहमींपेक्षा जरा लवकरच घरीं आले.

" आज जरा बरं वाटत नाहीं. " ते म्हणाले.

" काय होतय् ? "

" तस विशेष कांहींच होत नाही. जरा डोकं बरिक दुखतंय् ! "

" मग बामबिम काहीं चोळूं का कपाळाला ? "

" नको,–नकोच ! कांहीं नको ! " असं म्हणून पडून राहिले. पण मी थोडीच अशानें ऐकायला ! झटपट स्टोव्ह पेटवून गरम गरम कॉफी करून दिली आणि बामची डबी घेऊन मी हलक्या हातानें त्याच्या डोक्याला बाम चोळूं लागले. माझ्या हातांतली बामची डबी त्यानीं काढून घेतली आणि माझे दोन्ही हात त्यांनीं आपल्या हातात घट्ट धरून ठेवले.

" किती वेळ तरी ते माझ्याकडे सारखे पहात होते.

" हें काय बरं असं सारखं पाहात राहयाचं माझ्याकडं ! मी आजच नवीन का कोणी आल्ये आहे ? "

" सुधे, तूं आजच नवीन आली असतीस तर तुझ्याकडे असं टक लावून पाहण्याचा धीर कुणाला झाला असता ? सुधे !— "

" काय ? "

" मला वाटतं तूं कुणी तरी देवता आहेस ! "

" मला क्षणभर भास झाला कीं हे उपरोधिकपणानें तर असं बोलत नसतील ना ? पण त्यांच्या या बालकाप्रमाणे निष्पाप डोळ्याकडे पहातांच तो भास कुणी-कडच्या कुणीकडेच विरला.

" हें पहा, आतां थोडा वेळ झोपावं गडे ! म्हणजे अंमळ बरंहि वाटेल अन् डोकंहि थाबेल ! "

" छे, सुधे, तुझ्या प्रेमाला मी अगदी अपात्र आहे ग ! "

" छे, असं कुठं झालंय् ? मीच आपल्या प्रेमाला खरोखर अपात्र आहे. आपल मन किती थोर ! आपलं अंतःकरण किती पवित्र !—"

" नको, नको, सुधे, अधिक बोलून माझ्या हृदयाला आणखी घरं पाडूं नंकोस ! सुधे माझं मन—माझं अंतःकरण पवित्र नाहीं ग ! मी—मी पापी आहें. सुधे, मला क्षमा करशील का ? "

" माझी स्थिति अगदींच चमत्कारिक झाली. माझ्या कानावर माझा विश्वासच बसेना. मी कसं वागावं हेंही मला सुचेना ! काय ऐकत्ये मी !

" माझे हृदयेश्वर—आणि पापी ? "

" काय बरं त्याच्या हातून पाप झालं असेल ! "

" —अखेर त्यांनीं मला सांगितलं ! मोकळ्या भावानें त्यानी मला सारं निवेदन केलं. लग्नापूर्वी माझ्याप्रमाणेंच त्यांचेहि वाकडं पाऊल पडलं होतं !

" त्यानी माझ्याकडे दीनवाणीनं क्षमेची याचना केली.

" अन् मी ती तत्काल पुरविली. ' त्याचं काय एवढं लावून घ्यायचं मनाला ? तरुणपणीं होतात चुका माणसाच्या हातून कधीं कधीं ! ' मी म्हणाले.

" सुधे, आज मी खरोखरच धन्य झालों. आजपर्यंत तुझ्याशीं मी प्रतारणा करीत आहें या विचाराने माझं मन सारखं मला डंवचित असे. पण आतां सगळं कांहीं तुला सागून टाकल्यामुळे जीवाला कसं हायसं वाटलं. सुधे, तूं थोर मनानं मला क्षमा केलीस ! तूं खरोखरच देवता आहेस ! "

" आतां माझी पाळी होती. त्यांनीं मनांत छक्केपंजे कांहीं न बाळगता चट्-दिशीं मला सर्व काहीं सांगून दिलसफाई केली.—आणि मी ? मी मात्र आता-पर्यंत माझं हृदय झांकून ठेवलं ! किती किती आंतल्या गांठीची मी ? अन् आतां मी सागितलं तर त्याना काय वाटेल ? इतके दिवस मी ही गोष्ट त्यांच्या-

पासून लपवून ठेवल्यामुळें ते रागावणार तर नाहींत ना? अन् मग माझ्या 'देवता' पदाला केवढा धक्का बसेल? त्यापेक्षां मी पूर्वीच सर्व सांगून टाकलं असतं तर!

" घरसोडीच्या या अशा विचारातच आणखी आठ दिवस निघून गेले. शेवटी एकदा हिय्या केला—आणि सांगितलंच त्यांना!

" ते काहीच बोलले नाहीत! पण त्याचा चेहरा मात्र साफ उतरून गेला.

" तोच—तोच दिवस माझ्या आयुष्यांतला घातवार ठरला. त्या दिवसापासून त्यांचं माझ्यावरील प्रेम उडत चालल्याचं मला स्पष्ट दिसून येऊं लागलं. ते माझ्याशी कामावांचून इतर वेळीं बोलेनातसे झाले. त्याची मुद्रा त्रस्त आणि सरोष दिसू लागली.

" मी आपली अनंत अपराधी आहे. मला क्षमा करा!" अत्यंत काकुळतीस येऊन मी त्यांना म्हटलं.

" काय उपयोग त्या क्षमेचा? सुधे, तूं माझ्याशीं प्रतारणा केलीस! माझा विश्वासघात केलास! माझ्या तोंडून सर्व हकीकत समजून घेईपर्यंत तूं मला एका शब्दानेंहि दाद लागूं दिली नाहीस! फार काय पण त्यावेळींहि तुझ्या तोंडांतून चकार शब्द निघाला नाहीं. तूं कशीहि ऐस! पण माझं सारं सुख मात्र एका क्षणांत नाहीसं झालं. तुझ्याबद्दलचे माझे मनोरे एका पळात मातीस मिळाले. सुधे, झालं ते झालं, पण अतःपर तुझं नि माझं पटणं मात्र शक्य नाहीं. तुला चारी दिशा मोकळ्या आहेत."

" माझ्या रडण्याचा, विनवणीचा, पाय धरण्याचा काहींच उपयोग झाला नाहीं. त्यानीं आपलं म्हणणं अखेर खरंच केलं!

" झालं! मालतीबाई, हीच माझ्या आयुष्याची कहाणी! ती ऐकून तुमच्या मनाला मात्र त्रास झाला असेल; आणि ही आपली सुधाताई आपण समजत होतों तितकी चांगली नसून—"

मी तिच्या तोंडावर एकदम हात ठेवला.

" सुधाताई, मला तुम्ही आता पूर्वीहूनही अधिक आवडूं लागलां असं सांगितलं तर तें तुम्हाला खरं वाटेल का?"

तिनें वर मान करून माझ्याकडे पाहिलें.

तिच्या नजरेंत आशेचें साम्राज्य पसरलें होतें.



## प्रेमाचे पैलू !



' वैषयिकतेचा वाराहि न लागलेल्या अशा शुद्ध आणि सात्विक प्रेमाने त्याना आपलें आयुष्य व्यतीत करताना पाहून '—वाचता वाचता मी हातातील मासिक दूर भिरकावून दिले आणि चेष्टेच्या स्वराने आपल्याशीच मोठ्याने हंसलों.

" वा ! माधव, एखाद्या नाटकाची रंगीत तालीम चालवली आहेस कीं काय ? " जवळच ' क्रॉनिकल ' चाळीत बसलेल्या वसंताने विचारले.

" हो ! तुम्हां क़ॉलेज तरुणांना नाटकं आणि सिनेमा याखेरीज कांहीं दिसतच नाहीं का रे ? "

" माधव, हा कॉलेज-कुमारांचा अपमान होतो आहे ! कॉलेजियन म्हटला कीं आपल्या मनश्चक्षूंपुढं उच्छृंखल, स्वैर वृत्तीचा आणि चारित्र्यहीन असा तरुण हटकून उभा करणारे बरेचसे हरीचे लाल मी पाहिलेले आहेत; पण या अशा लोकाच्या मालिकेंत तूं आपल्यालाही बसवून घेशील, असं नव्हतं मला वाटलं ! " वसंत किंचित चिडक्या स्वरांत म्हणाला.

" हं, आतां ठीक झालं ! तूं असा थोडासा वर्दळीवर आलास कीं मला जरा हायसं वाटतं. किंबहुना नेहमींच प्रशांत दिसणाऱ्या तुझ्या मानस सरोवरांत असा एखादा दगड टाकून त्यात बारीक बारिक लाटा उत्पन्न करणं हा तर माझा आतां मनोधर्मच होऊन बसला आहे. "

" अस्सं ! आणि वाचता वाचता मधेंच पुस्तक फेंकून देऊन आपल्याशींच मोठ्यानं हांसणं हाहि तुझ्या मनोधर्माचाच एक नमुना असं समजावयाचं कीं काय ? "

" वसंत, अरे हंसूं नको तर काय करूं ? तरुण स्त्रीपुरुषामध्ये वसणाऱ्या प्रेमाला कुणी शुद्ध आणि सात्विक म्हटलं कीं माझ्या पायाची तिडिक मस्त-काला जाते ! "

" म्हणजे ? तरुण तरुणीत शुद्ध आणि निर्हेतुक प्रेम असणं ही गोष्ट तुला अशक्य वाटते कीं काय ? " वसंतानें किंचित आश्चर्यानें विचारले.

" होय ! " मी जोरानें म्हणालों, " अशा तऱ्हेचं प्रेम हें केवळ कवींच्या कल्पनेतच असूं शकेल ! व्यवहारात त्याचं आस्तित्व औषधालाहि सापडणार नाहीं असं माझं ठाम मत आहे ! "

" माधव, रागावूं नकोस ! पण मी खात्रीनं सांगतों कीं, मनुष्याच्या मनोवृत्तींत कुठं तरी गढूळपणा आल्याखेरीज त्याची विचारसरणी अशी बनणं मला तरी शक्य वाटत नाहीं. आपल्याच स्वभावरूपी आरशात दुसऱ्यांचीं स्वभावचित्रं पाहण्याची आपल्याला संवय पडून गेलेली असल्यामुळं आपल्या बऱ्यावाईट मनोवृत्तींचच प्रतिबिंब त्यांत पडणं साहजिकच आहे ! "

वसतानें अप्रत्यक्षपणें माझ्या मनोवृत्तीवर केलेला हा वार मला आवडला नाहीं. मी थोडासा रागावलों; पण राग लपविण्यात मी कुशल असल्यामुळें बाह्यतः हंसल्यासारखे करून मी म्हणालो, " हे पवित्र मनोवृत्तीच्या गंभीर महासागरा, मला तूं गढूळच का—अगदीं नीच वृत्तीचा म्हटलंस तरी मी रागावणार नाहीं, पण त्यामुळं मी माझं मत बदलीन हें मात्र शक्य नाहीं ! "

" माधव, सत्य कधीं लपून राहत नाही. त्याची प्रतीती माणसाला केव्हां ना केव्हां तरी येतेच येते. माझा अगदीं पूर्ण विश्वास आहे कीं तुझं हे मत आज नसलं तरी कालांतरानं बदलल्याशिवाय खास रहाणार नाहीं ! " एवढे बोलून वसंताने माझा निरोप घेतला.

अशा तऱ्हेचे लहान मोठे खटके आमचे नेहमींच उडत ! पण त्यामुळें आमच्या निस्सीम मैत्रीला कधींच बाध येत नसे. वसंत कॉलेजात जात असे. तर मी आपल्या नोकरी धंद्यामागें जात असे; पण हें आमचे व्यवसाय-भिन्नत्वहि आमच्या मैत्रीच्या आड कधीं आले नाही. वसत कॉलेजमधून आला की मी ऑफिसांतून येईपर्यंत थाबत असे आणि मग आम्ही दोघे गप्पा गोष्टी करीत समुद्रावर फिरावयास जात असू. हा आमचा नेहमीचा दैनिक कार्यक्रमच होऊन राहिला होता.



**त्या** दिवशीं असेच आम्ही दोघे फिरावयास निघालों होतों. बोलतां बोलतां वसंत सहज म्हणाला, " माधव, आजची नवीन बातमी तुला समजली का ? " मी प्रश्नार्थक मुद्रेने त्याच्याकडे पाहिलें.

" तुझ्या बाजूच्या रिकाम्या झालेल्या ब्लॉकसाठीं तूं आपल्या एका नातेवाईका-साठीं खटपट चालवली होतीस ना ? "

" हो, मग त्याचं काय झालं ? "

" ती तुझी खटपट व्यर्थ गेली ! "

" ती कशी ? "

" अरे तो ब्लॉक आज भरला. "

या निराशाजनक बातमीनें मी थोडासा अस्वस्थ झालों. कारण ज्या माझ्या नातलगासाठीं मी खटपट करीत होतों, त्याला त्या जागेबद्दल मी शंभर टक्के हवाला दिला होता. त्यामुळें आता त्याला काय जाब द्यावा याचा मी विचार करूं लागलों.

मी बराच वेळ बोलत नाहींसा पाहून वसंत माझ्या खांद्यावर हात ठेवीत म्हणाला, " माधव, काय माणूस आहेस रे तूं ! तो ब्लॉक भरल्याचं तुला मी सांगितलं तर निदान बुवा तिथं कोण राहायला आलं वगैरे काही विचारावयाचं, तें सोडून राहिलास आपला आपल्याच विचारात गर्क होऊन ! "

" खरंच ! तें राहिलंच विचारावयाचं ! कुणी घेतला तो ब्लॉक ? "

" माझ्याच एका कॉलेज मैत्रिणीनं ! " वसंतानें निर्विकार मुद्रेनें उत्तर दिलें.

" म्हणजे तुला मैत्रिणीहि आहेत वाटतं ? माझ्याकडे नाहीं कधीं बोललास तें ?"

" मुद्दाम बोलण्यासारखं यात एवढं विशेष तें काय आहे ? "

मी त्याच्या नजरेला नजर भिडविली. तोच त्याचा नेहमीचा निर्व्याजपणा आतांहि तिथें दिसत होता.

" तिचं नाव शकुंतला ! फार चांगल्या स्वभावाची आहे ती ! तुझी होईलच आतां तिच्याशीं ओळख म्हणा ! शेजारींच आहे ती ! "

" नको बुवा ! अशा ओळखी करणं माझ्या स्वभावाच्या विरुद्ध आहे हें तुला माहित नाहीं वाटतं ? "

" हेंच तें ! एखादीशीं मुद्दाम ओळख करून घेण्याचा प्रयत्न करणं हें अयोग्य ! पण कारणपरत्वें सहजगत्या ओळख झाली तर पवित्र अंतःकरणाच्या तरुणाला तरी त्यांत काहीं पाप आहे असं वाटायला नको ! तसं वाटणं म्हणजेच पर्यायानं आपलं मन पापी असल्याची कबूली देणं असं नाहीं का ? "

" म्हणजे अखेर तूं आपल्या मूळ वादावर आलास म्हणावयाचा ! " तो विषय नंतर तेथेंच थाबला.

कधीहि खंड न पडता अगदीं नियमितपणें फिरावायला जाण्याचा आमचा तो दिवस म्हणजे अखेरचाच ठरला. त्यानंतर आम्ही फिरायला जात नसूं असें नाहीं, पण आता त्यात पूर्वीचा नियमितपणा राहिला नव्हता. कधीं एकटा, कधीं शकुंतलेबरोबर तर कधीं माझ्याबरोबर अशा वसंताच्या फिरण्याच्या तीन तऱ्हा होऊं लागल्या.

वसंत–शकुंतलेची मैत्री वाढत्या प्रमाणांत होत असलेली मी पहात होतों. मी मात्र शकुंतलेशीं ओळख होण्यास कारणीभूत होणारा प्रत्येक प्रसंग टाळीत होतो. असे करण्यांत माझ्या अति भिडस्त स्वभावानेहि मला चांगलाच हात दिला होता. पण असे असलें तरी तिच्या आणि वसंताच्या हरएक हालचालींवर मी सूक्ष्म नजर ठेवली होती. असे करण्यांत माझा एक हेतु होता. तो म्हणजे वसंताच्या प्रेमाचें पावित्र्य कितपत टिकून राहते तेंच मला पडताळून पाहावयाचें होतें. आणि प्रसंग गाठून त्याच्या पावित्र्याच्या गप्पा किती फोल आहेत, तें त्याला दाखवून द्यावे असा माझा बेत होता. पण जसजसे दिवस जाऊं लागले तसतसें माझ्या कामांत मला यश येणें ही गोष्ट दिसते तितकी सोपी नाहीं हें मला कळून येऊं लागले. वास्तविक त्यांच्या मैत्रीवर, त्याच्या एकत्र फिरायला जाण्यावर, त्याच्या गप्पा मारण्यावर आजूबाजूच्या लोकानीं कधींपासूनच टीकेची झोड उठवावयाला सुरवात केली होती. पण ही टीका मला बिलकूल पसंत नव्हती. कारण एकमेकांशी बोलणे अगर फिरावयाला जाणें हाच काय तो त्याच्या साऱ्या टीकेला आधार ! पण त्यांच्या चारित्र्याविषयीं शंका घेण्यास एवढाच आधार मला मुळींच पुरेसा वाटत नव्हता.

त्या दिवशीं रात्रीं जेवण झाल्यावर नेहमींप्रमाणें गप्पा छाटण्यासाठीं वसंताच्या खोलीवर गेलो. पण खोलीला कुलुप असलेलें पाहून मी परत आपल्या खोलींत येऊन वाचीत पडलों. दहा साडेदहाचा सुमार होताच माझे डोळे झोंपेनें पेंगूं लागले. पुस्तक मिटलें आणि बिछान्यावर अंग टाकण्यापूर्वी एकदा वसंताची खबर घ्यावी म्हणून गेलो. खोलीला लावलेलें कुलुप अजूनहि तसेंच होतें. आता मात्र माझ्या विचाराला चालना मिळाली. अत्यंत निकडीच्या कामाशिवाय वसंत रात्रींच्या वेळी बाहेर पडलेला मला तरी काहीं आठवला

नाहीं. कुठें बरें गेली असेल ही स्वारी ? मनात दुसराच एक संशय डोकावला. मी हळूच शकुंतलेची कांहीं चाहूल लागते की काय ते पहावे म्हणून मागें परतलों. माझ्या खोलीच्याच समोर ग्यालरीला टेकून शकुंतलेचा छोटा भाऊ श्याम उभा होता.

" काय रे, अजून झोंपला नाहींस तूं ? " मी हळूच त्याला विचारलें.

" नाही ! आम्ही ताईची वाट पहात आहों ! " त्यानें उत्तर दिलें.

' कुठें गेली आहे तुझी ताई ? ' असा प्रश्न विचारण्याचें माझ्या अगदीं मनांत येऊन गेलें. पण संयम करून ते शब्द मी ओठांतच जिरवले. मिळाली एवढीच बातमी मला तूर्त पुरेशी होती. खास ही दोघेही एकत्र कुठे तरी गेलेलीं असावींत ! तो काही नाटकाचा वार नव्हता. मग तीं सिनेमालाच गेलीं असावींत ! मी मनाशीच विचार करूं लागलो. एकांतवासाचे इतके प्रसंग वरचेवर येत असताही याच्या प्रेमाचें पावित्र्य कायम राहणे कधीतरी शक्य आहे का ? कधींच नाही ! ते शक्य आहे असे मानणे म्हणजे मनुष्यस्वभावाची आपल्याला बिलकूल पारख नाहीं हे कबूल केल्यासारखेंच आहे. मनुष्य कितीही सदाचरणी असला तरी त्याच्या सदाचाराला काहीं सीमा असतेच कीं नाहीं ? बस्स, ते काहीं नाहीं ! आता वसंत भेटला कीं संधि पाहून त्याचे दांत त्याच्या घशात घातलेच पाहिजेत असा मी निश्चय केला.

दुसऱ्या दिवशीं कामाच्या गर्दीमुळें मला ऑफिसातून यायला बराच उशीर झाला. रात्रच झाली म्हटले असता अधिक शोभेल. खोली उघडून मी बटन दाबलें पण खाणावळीचा डबा गड्यानें आणून ठेवलेला काहीं मला दिसला नाहीं. इतकी रात्र त्यानें आजपर्यंत कधीं केली नव्हती. मी कोट व टोपी काढली. हातपाय स्वच्छ धुतले आणि गड्याच्या शोधार्थ निघालों. गडीबहादूर आपल्या बांकड्यावर हातपाय ताणून पडले होते. त्याचें शरीर जाग्यावर होतें, पण भान हरपलें होते. स्वारीनें ' नवटाक ' झोकली होती याबद्दल आतां संशयच राहिला नाहीं. जेवणाचें काय करावयाचें ? भूक तर सपाटून लागली होती. खाणावळींत इतकें लांब जाण्याचें अगदीं जिवावर आलें होतें. बरें कदाचित् गेलों आणि रात्र झाल्यामुळें त्यानें सगळी आवराआवर केली असली तर पंचाईत ! विचार करून अखेर ठरविलें कीं घरांत दूध आहे. कॉफी

करून घ्यावी आणि स्वस्थ झोंपावं ! मी लगेच स्टोव्ह पेटविण्याच्या तयारीस लागलों. कुणीतरी दारांत डोकावून गेल्याचा मला भास झाला. स्टोव्ह पेटवून मी आधण ठेवले. पुन्हां कुणाची तरी चाहूल लागली म्हणून दाराकडे वळून पाहिले तो दारात शकुंतला उभी ! मी तसाच उठलों आणि पुढें होऊन विचारले, " काय हवं ? "

" कांही नको ! आईनं पान वाढलं आहे ! मी आपल्याला—जेवावयाला बोलवायला आल्ये आहे. " मधुर स्मित करीत ती म्हणाली.

" पण—पण मला आतां भूक नाही ! " मी हे शब्द कसेतरी उच्चारले.

" वा ! तुमची भूक पण अगदी आज्ञाधारक असते. गड्यानं पळ काढताच तिनंहि पळ काढला वाटतं ? "

" तसं नाहीं, पण उगीच तुम्हाला कशाला त्रास ? "

" आम्हाला त्रास वाटला असता तर आम्ही आपण होऊन तुम्हाला कधीं बोलावलं असत का ? आता यायच मनात नसेल अगर आमच्याकडे जेवणं आपल्याला आवडत नसेल—"

" छे छे ? तसा काहीच प्रकार नाहीं ! चला मी आलों ! "

मी पानावर बसून जेवत होतो खरा, पण जेवतांना माझी जी काय त्रेधातिरपिट उडत होती ती माझी मलाच माहीत ! शकुंतलेची आई आणि शकुंतला माझ्याशी मधून मधून बोलत होत्या—हे घ्या, तें घ्या, असं सारखं चालविलं होतं त्यांनी ! पण माझ्या तोंडातून ब्र बाहेर पडेल तर शपथ ! कसाबसा एकदांचा जेवून मी आपल्या खोलींत परत आलो तेव्हां कुठे मी सुटकेचा निश्वास टाकला !

थोड्या वेळानें वसंत आला तो हंसत हंसतच ! हे हंसणारे दांत आतां लवकरच मी त्याच्या घशात घालणार या विचाराने मीहि आपल्याशींच हंसलों.

" आहेऽऽबुवा ! " माझ्याकडे मिस्किलपणे पहात तो म्हणाला.

मी मनात किंचित् चपापलो, पण बाह्यतः तसे कांहीं न दाखवितां मी म्हणालों, " काय रे काय झालं आहेऽऽबुवा करायला ? "

" अरे बाबा, असल्या गोष्टी लपून का कुठं राहतात ? अस्सं ! एकूण एव्हांपासूनच जांवयाची बडदास्त ठेवायला लागली म्हणायची सासूबाई ! "

मी विस्मयचकित मुद्रेनें त्याच्याकडे पाहिलें. त्याच्या चेहऱ्यावर विनोदाची झांक मारत होती पण त्यांत कुत्सितपणा बिलकूल नव्हता.

" वसंत आज काय तूं भांगबिग पिऊन तर नाहीं ना आलेला ? "

" माधव, जी गोष्ट लवकरच जगजाहीर करावी लागणार आहे ती तूं माझ्यापासून लपवून ठेवूं पाहतोस याला काय म्हणावं ? पण माधव, लग्न झाल्यावर शकुंतलेला अगदीं फुलासारखी वागवायची हं ! "

ही काय भानगड ? एवढयातल्या एवढ्यात माझें शकुंतलेशी लग्नसुद्धां लावून झाली स्वारी पार !

" वसंत, तुझं शकुंतलेवर निस्सीम प्रेम आहे अस म्हणतोस—तिच्याबद्दल असं कांहीं बोलताना तुला काहींच का रे वाटत नाहीं ? "

" खरं आहे ! माझं तिच्यावर निस्सीम प्रेम आहे. आणि आपल्या प्रेमाच्या माणसाचं जास्तीत जास्त हित व्हावं हीच माझी मनीषा असल्यामुळ तर मी असं बोललो. "

" पण जास्तीत जास्त हित करण्यापेक्षा शंभर टक्कं हित करणं हे अधिक चागलं नव्हे का ? मग तूंच तिच्याशी लग्न—"

" माधव काय बोलतोस हे ! माधव, आमचं दोघाचं एकमेकीवर प्रेम आहे हें आम्हीं प्रांजलपणं कबूल करतो. पण त्या प्रेमात कसल्याच तऱ्हेचा गढूळ-पणा नव्हता. तें अत्यंत शुद्ध आणि पवित्र असंच होतं व आहे. मग लग्नाचा पार्थिव विचार आमच्या स्वप्नात तरी कसा यावा ? "

त्याचें म्हणणें मला पटले. शकुंतलेचा विवाह माझ्याशीं व्हावा ही त्याची उत्कृष्ट इच्छा म्हणजेच त्यांच्या प्रेमाच्या पावित्र्याचा पुरावाच नाही का ? पण मनांत थोडाहि किंतु राहू नये म्हणून मी त्याला मधेंच प्रश्न केला,

" काय रे वसंत, रात्री कुठं गेला होतास ? "

" काल रात्रीं ?—अरे बाबा काल दुपारींच आमच्या कॉलेजचे बरेचसे विद्यार्थी पुण्याच्या ट्रीपला गेले होते. त्यांच्याबरोबर मीहि गेलों. आतां एवढं खरं कीं जातांना तुला कळविणं मला शक्य झालं नाहीं. पण त्याचें कारण म्हणजे सगळा बेत अगदीं आयत्या वेळींच झाला. सारी गडबड नि धांदल ! शकूलाहि ही बातमी मला आगाऊ कळवितां आली नाहीं ! "

" म्हणजे ? ती नव्हती वाटतं तुमच्या ट्रीपमध्ये ? "

" छट् ! ती अलीकडे चारपाच दिवस कॉलेजात तरी येत असते ? तिची एक बहीण फार आजारी आहे, तिच्याकडे हल्लीं ती रोज जात असते. रात्रीं फक्त घरी येते. "

माझ्या मनातील सारे किंतू आता दूर झाले होते. पण त्यामुळे मी मात्र अगदीं निराळ्याच परिस्थितीत येऊन पडलो होतो. इतके दिवस एकाच मजल्यावर शेजारीं शेजारी राहिल्यामुळे शकुंतलेच्या प्रेमळ आणि सुस्वभावी वृत्तीची मला खात्रीच होती. ती दिसण्यातहि मोहक आणि सुंदर दिसे. पण ही बाजू अशा रीतीने अंगावर येईल ही कल्पनाच नसल्यामुळे मी जरासा गांगरून गेल्यास नवल काय ?

" माधव, हे पहा ! आमच्या शकुला तूं अगदी पूर्णपणें पसंत आहेस याबद्दल वाद नाही ! पण तुला आमची शकु पसंत आहे का ? "

माझ्या तोंडातून शब्दच बाहेर फुटेना !

" पसंत नाही म्हणून सांगू का ? " वसंताने विचारले.

" तसं सांगण्याची कांहीं जरुर नाहीं ! " मी अधिऱ्या मनाने उत्तर दिलें.



# प्रीति-प्रसाधन

"पण मी म्हणतों, ज्यांत त्यांत तूं असा खो घालायला लागलास तर व्हायचं तरी कसं ?" पद्माकर किंचित् चिडून बोलत होता.

"हो मीच नेहमीं खो घालतो ! जशी कांही मला बहिणीची काहीच माया नाहीं ! तूं तिचा भाऊ आहेस, आणि मी मात्र तिचा शत्रू—"

"असं नाहीं मी म्हणत दादा," पद्माकर किंचित नरमाईने बोलूं लागला. "पण तूंच पाहा, हाताशीं आलेलं प्रत्येक स्थळ तूं जर काही ना काही खुसपट काढून धुडकावून लावूं लागलास तर निशेचे लग्न जमावं तरी कसं ? तिचं लग्नाच वय होऊन किती वर्षं लोटली हे तुला माहित आहे ना ?"

"माहित नसायाला काय झालं ? आणि आजकाल निशेपेक्षाही अधिक वयाच्या अविवाहित मुली तुला मी किती दाखवूं ? निशेचें लग्न होऊं नये अशी माझी इच्छा आहे कां पदू ? माझं म्हणणं एवढंच कीं जें स्थळ मिळेल तें सर्व बाजूनीं चांगलं असावं ! म्हणजे मागाहून तिनें म्हणायाला नको कीं भावांनीं मला एकदांची कशीबशी घराबाहेर लोटली नि झाले मोकळे !" यशवंत म्हणाला.

"हें बघ दादा, तुझ्या या कल्पनेप्रमाणें सर्व बाजूंनी चांगलें स्थळ मिळायाला निशेला जन्मभर अविवाहितच राहावं लागणार आहे. असें स्थळ मिळायाला आम्ही तरी एवढे कोण मोठे लागून गेलो आहोत ? अमक्याच्या घरी सासूसासरेच नाहींत तर तमक्याचा जमीनजुमला नाहीं. तिसऱ्या कुणाला अधिक पगार नाहीं तर चवथा फारसा इंग्रजी शिकलेला नाहीं ! अशा या ना त्या कारणानें प्रत्येक स्थळांत मोडता घालण्याचें तूं अगदीं हातीं कंकणच बांधून उभा राहिला आहेस कीं काय कोण जाणे ! तें कांहीं नाहीं ! हें देशपांड्याचें स्थळ फार चागलें आहे. नवरा मुलगा स्वभावाने चांगला आहे. आणि शिवाय दोघांचीं सहज पोटें भरतील एवढा पगारहि मिळत आहे त्याला ! मग देऊं का रुकार त्यांना ?"

" बस्स कर तुझें पांडित्य ! मी तिचा वडील भाऊ आहे ! या बाबतींत मला शहाणपणा शिकवायला तूं नको आहेस ! म्हणे नवरा मुलगा चांगला आहे ! कुठल्याही गोष्टीकडे दूर दृष्टीने पाहण्याची संवयच नाहीं तुम्हाला ! समजा उद्यां या नवऱ्या मुलाचं कांहीं बरं वाईट झालं तर तिची कोण अन्नान्न दशा होईल याची आहे का तुला काहीं कल्पना ? पदू, तुला मी एकदांच बजावतो कीं निशेच्या लग्नाच्या बाबतींत तुला कसलीच ढवळाढवळ करण्याचें कारण नाहीं ! देशपांड्यांना मी आज सकाळींच नकारघंटा दाखवून आलो. " यशवंत रागारागानें म्हणाला.

" तिच्या जन्माची माती करून टाक म्हणजे सुटलास एकदांचा !" कसेबसे हे शब्द उच्चारून पद्माकर खोलीबाहेर आला. आजच्या प्रकरणानें त्याचें मन फारच अस्वस्थ झाले होते. स्वतःच्या झालेल्या अपमानाच्या जाणीवेपेक्षांही बहीणीच्या लग्नाची दादानें चालविलेली ही विटंबनाच त्याला अधिक असह्य झाली. त्यातच ऑफिसातील कामाच्या दगदगीनें त्रासून नुकताच तो घरीं आलेला. त्याचे मस्तक जोरजोराने भ्रमण करूं लागले. काय करावें तेंच त्याला सुचेना ! अधिक उण्या शब्दानी दादाशीं भांडलों तर त्यांत निशेचें कल्याण होण्यापेक्षां अनहितच होण्याचा संभव जास्त; पण अशा स्थितींत मुक्याचें व्रत धारण करून कालहरण करणेही त्याला धोक्याचे वाटूं लागले.

चूळ भरून टाकण्यासाठीं तो मोरीवर गेला. निशेनें घरांत एक पाट मांडून चहा आणि बटाटे पोहे त्यांच्यासाठीं तयार करून ठेवले होते. निशेची ही तत्परता आज त्याला विशेषच बोचक होऊं लागली. ईश्वरानें आपल्याला प्रेमळ बहिण दिली आहे पण तिचे हित करण्यास, तिला सुखी करण्यास हवें असलेलें सामर्थ्य मात्र आपल्याला दिले नाही या जाणीवेनें त्याचे मृदु मन फारच व्याकुळ झालें. तो पाटावर बसला पण त्याची सारी भूक मरून गेली होती. तसेंच उठावें तर निशेला वाईट वाटावयाचें म्हणून कसेबसे पोह्याचे दोन चार चमचे तोंडात कोंबून त्यानें चहा गट्ट केला आणि जरा डोकें शांत करावें या हेतूनें तो समुद्रावर जाण्यास निघाला. जातांना नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें त्यानें खालच्या मजल्यावर असलेल्या अविनाशच्या खोलीचें दार ठोठावलें. अविनाश कपडे करून तयारच होता. त्यानें खोलीला कुलूप अडकाविलें आणि ते दोघे बाहेर पडले.

रस्त्यानें जाताना गप्पा गोष्टी करीत जाण्याचा त्यांचा नेहमीचा रिवाज, पण

आज पद्माकरानें वाटेंत एकदांही तोंड उघडलें नाहीं याचें अविनाशाला फार आश्चर्य वाटलें. त्यानें अस्वस्थ मनानें पद्माकराकडे पाहिलें. त्याची मुद्रा उतरून गेलेली त्याला दिसली. पद्माकराच्या घरीं अविनाशचें नेहमींच जाणें येणें असल्यामुळें त्याच्या घरांतलि वादळाची त्याला कल्पना होतीच, पण पद्माकराची ती स्थिति पाहून त्या वादळानें आज काही निराळेच स्वरुप धारण केलें असावें असा त्यानें तर्क केला ! समुद्रावर चार दोन फेऱ्या घालण्याचा नेहमींच्या कार्यक्रमाला आज त्यानीं टाळा दिला आणि विशेष वर्दळ नसलेल्या अशा एका जागीं ते जाऊन बसले.

बराच वेळ झाला तरी पद्माकर बोलत नाहींसा पाहून अविनाशनें आपण होऊनच बाध फोडण्यास सुरवात केली.

" काय रे पदू, आज कांहीं कमजास्त घडलं वाटतं घरीं ? "

" कमजास्त काय घडायचं ? नेहमीचंच चाललं आहे हे ! मला आता अगदीं वीट येऊन गेला आहे सगळ्या गोष्टीचा ! " बोलता बोलता पद्माकराचे डोळे अश्रूंनीं डबडबून आले.

" पदू, वेड्या असं वैतागून कसं चालेल ? काय झालं ते मला सांग ! म्हणजे त्यांतूनही मार्ग काढूं आपण ! जगांतील प्रत्येक घटनेला ईश्वर थोडीशी तरी पळवाट राखून ठेवतो. अडचणीत सापडलेल्या माणसांनीं या पळवटीचा फायदा करून घ्यावयाचा असतो ! "

" तशी पळवाट आता आम्हाला एकच ! निशेच्या आणि माझ्या जीवाचे कांहीं तरी बरं वाईट होणें—"

" पदू, तुझें डोकें आज ठिकाणावर दिसत नाहीं, म्हणून तूं असें बोलतोस ! निशेच्या लग्नाचं पुनः फिसकटलं वाटतं ? "

" होय, ! आणि तेही आमच्या दादामुळें ! त्यानें आपल्या डोक्यांत भरून ठेवलेल्या विचित्र कल्पनाचा त्याग जोपर्यंत तो करीत नाहीं तोंपर्यंत निशेच्या लग्नाचं कधींच जमायचं नाहीं हें नक्की ! अविनाश, तुला कल्पना नाहीं, ज्या ज्या वेळीं आपल्या लग्नाचें फिसकटलेलें निशेच्या कानीं येतें त्या त्या वेळीं तिच्या कोमल हृदयावर जे दारुण घाव बसतात त्याची यथार्थ कल्पना आमच्या दादाला कधींच यायची नाहीं. आम्हाला दुःख होऊं नये म्हणून ती आपली आनंदी वृत्ति बाहेरून कायम राखण्याची जिवापाड खटपट करीत असते. पण

या कृत्रिम आनंदाचा झिरझिरीत पडदा जरा दूर सरला की तिचें अंतःपटल निराशेच्या कृष्ण मेघांनी कसे दाट व्यापून गेलें आहे तें लगेच दिसून येतें. पण हें पहायला झाले तरी खऱ्या प्रीतीचे–जिव्हाळ्याचे डोळे असावे लागतात ! आणि आमच्या दादापाशीं तर त्याचा पूर्ण अभाव ! मग त्याच्या नजरेला या गोष्टी याव्यात कशा ! असा तिच्या जिवाचा कोंडमारा होऊन बसला आहे ! ”

“ खरं आहे तुझं म्हणणं ! निशेची ही स्थिति अलिकडे माझ्याहि अनेकदां निदर्शनास आली आहे. बोलता बोलता मधेच स्तब्ध राहणे; एक एक गोष्ट तीन तीनदा सांगावी लागणे; बोलण्यात विसगति दिसणें इत्यादि अनेक गोष्टी तिच्याशी बोलताना माझ्या लक्षात आलेल्या आहेत ! ”

“ होय ना अविनाश ? तुलाहि हाच अनुभव आला आहे ना ? पहा ! मी म्हणतो ते हेंच ! जी गोष्ट तुझ्यासारख्याच्या ध्यानात चटकन् येते ती दादाच्या ध्यानीं येऊं नये याचा अर्थ काय ? दादाचे निशेवर असाव तेवढं प्रेम नाही असाच नाही का याचा अर्थ ? आपलेपणाच्या भावनेने पहिल्याखेरीज ही अंत-रंगातील गूढ रहस्ये कुणालाहि उलगडणं शक्य नसतं ! तूं माझ्या निशेबद्दल जेवढी कळकळ दाखवितोस त्याच्या निम्याने जरी—

“—अविनाश, अनेकदा माझ्या मनात येतं की माझ्या निशेला पदरात घे, म्हणून तुलाच गळ घालावी म्हणून ! पण तुझ्या मित्रत्वाचा फायदा मी अशा रीतीनें घेतलेला पाहून तूं मला कृतघ्न तर म्हणणार नाहीस ना, या शंकेनें माझ्या ओठातले शब्द ओठातच जिरतात ! ”

“ पद्माकर, खरं सागायचं म्हणजे निशेसारख्या गोड मुलीनें माझें पत्नीपद सुशोभित करणें हे मी माझे भाग्यच समजतो. पण तुमच्या अडचणींचा मी फायदा घेतला असें तुम्हाला वाटूं नये म्हणूनच मी आजवर मूग गिळून बसलों होतों. तुमची सर्वांची अनुमति असेल तर निशेशीं विवाहबद्ध होण्यास मी एका पायावर तयार आहे ! ”

आकाशात दाट जमलेले मेघ वाऱ्यानें दूर होतांच जसें सूर्यदर्शन घडतें तद्वतच पद्माकराच्या चेहऱ्यावरील उल्हास–सूर्याचे दर्शन अविनाशला घडले.

“ हें बघ अविनाश !” थोडया वेळानें पद्माकर म्हणाला, “तुझ्या आश्वासनानें माझ्या हृदयावरील अर्धेंअधिक दडपण कमी झालें आहे. पण आतां तुला आणखी एक विनंति करायची आहे. आमच्या दादांना हा संबंध पसंत पडाव-

याचा नाहीं ! हें केवळ अनुमान नव्हे ! एकदा मी सहज तुझ्याबद्दल त्याच्याकडे बोललों होतों. आणि त्यावेळीं त्याने मला एकदम धुडकावून लावलं होतं ! तेव्हां माझी विनंति एवढीच आहे की, वेळी अवेळी दादाकडून तुझा अपमान होण्याचा संभव आहे. त्याच्या शब्दानी अगर कृतींनीं तुझे मन दुखावले जाण्याचा बराचसा संभव आहे; तरी अशा वेळीं निशेकडे आणि माझ्याकडे पाहून तूं तो सारा अपमान गिळला पाहिजेस !"

"पद्माकर, त्याबद्दल तूं पूर्ण निर्धास्त रहा ! तुला दिलेले वचन मी आपल्या प्राणाचे मोल देऊनही पाळीन एवढे सांगितले म्हणजे तुझी खात्री होईल ना ?"

"बस, बस ! तुझे सहाय्य असल्यावर मला काय अशक्य आहे ?"



"पद्माकर, हें पहा तुला मी आता अगदीं शेवटचे निक्षून सांगतो की माझ्या घरात हे असले थेर अतःपर मी चालूं देणार नाही. !"

"कसले थेर दादा ? काय झालं ?"

"काय झालं ? अरे काय व्हायचं राहीलं आहे ते तरी सांग ? डोळे असून आंधळ्याचें सोंग घेण्याची कला चांगलीच साधली आहे तुला ! मी तुला स्पष्टच विचारतों, निशेचे हें सध्याचे वर्तन तुला पसंत आहे का ?"

"दादा, पसंत न पडण्यासारखं काय आहे तिच्या वर्तनात ? मला तर काही विशेष फरक पडलेला दिसत नाही तिच्या वागणुकीत ?"

"अरे अरे ! पदू, तूंच का बोलत आहेस हें ? अविनाशशीं होणारें तिचें अलिकडचें वर्तन तुला मानवतें ना ? त्या दोघानी एकमेकाशी फार सलगीनें वागणें, वेळीं अवेळीं एकांतांत गुलगुल गोष्टी करीत राहणें, प्रसंगी माझ्यापेक्षाही त्याची बडदास्त ठेवणें, या साऱ्या गोष्टींत तुला वावगें असें काहींच वाटत नाही ना ?" यशवंताच्या संतापाचा पारा वर चढत होता.

"दादा, मी तुला त्याच दिवशीं सांगून टाकलं ना कीं, निशा आणि अविनाश हीं दोघेंही परस्परावर अनुरक्त आहेत आणि तुझ्या विरोधाला न जुमानता ती लवकरच विवाहबद्ध होणार आहेत म्हणून ! मग अशा जोडप्याने थोडेसे प्रियाराधन केलं तर त्यांत बिघडलं कुठें ? भावी वधुवरें एकमेकाशीं थोडींफार मोकळेपणानें वागूं लागलीं तर लगेच पाप पाप म्हणून ओरडणे म्हणजे 'साप साप' म्हणून भूमी बडवण्यासारखेंच नाहीं का ? आणि दादा, या गोष्टीला दुसरीही एक बाजू आहे.

त्याचाही तुला अवश्य विचार केला पाहिजे. आज निशेचें वय जवळ जवळ पंचवीस वर्षांचे आहे. मुंबईसारख्या शहरात तिचे आयुष्य गेलेलं ! लहानपणा-पासून कधीं सिनेमाना अगर नाटकाना तूं तिला घेऊन जात होतास ! प्रणय-कथाची अनेक पुस्तके सहजच तिच्या वाचण्यात आलेलीं ! कळत वा नकळत तिच्या नैसर्गिक मनोविकाराचे अशा रीतीनें उद्दीपन होत गेलेलें ! आपल्या बरोबरीच्या साऱ्या मुलींचीं भराभर लग्नें होऊन त्याचे थाटलेले संसारही हिनें पाहिलेले ! ज्या चाळीत आम्ही राहतो त्या चाळींतील सारी बिऱ्हाडें आपापल्या संसारसुखांत मग्न होऊन राहिलेली तिला दिसत होती. दादा, रागावूं नकोस ! पण प्रत्यक्ष आमच्या घरात तुझ्या आणि वहिनीच्या संसाराचें मनोरम चित्र चौवीस तास तिच्या नजरेसमोर खेळलेलें ! या आणि अशासारख्या इतर अनेक बारिकसारिक गोष्टींचा तारुण्यात पदार्पण केलेल्या तिच्या यौवनसुलभ भावनावर, तिच्या विकाराविचारांवर काय परिणाम झाला असेल याचा तूं कधीं विचार केला आहेस का ? बरें, अशा रितीनें उद्दीपित झालेल्या मनोविकारांना योग्य दिशा लावण्याचा जो हा विवाहाचा शिष्टसंमत मार्ग-तो मार्ग तरी तिला सुलभ करून देण्याचा तूं कधीं प्रयत्न केलास का ! उलट अशा तऱ्हेची आलेली प्रत्येक संधी या नाहीं त्या कारणानें गमावून बसण्यास तूं कारणीभूत झालास ! आणि आपल्या भावी पतीच्या सहवासाने तिच्या दबलेल्या—गुदमरून गेलेल्या मनोवृत्तीचे पुनरुज्जीवन होऊं लागलेलें पहाताच ' अब्रह्मण्यम् ! ' म्हणून ओरडायला तुझी तयारीच ! दादा, तुला हात जोडतों हवा तर, पण या जुळून आलेल्या लग्नात मोडता घालून निशेच्या जन्माची कायमची राखरागोळी करूं नकोस एवढीच माझी तुला विनंति आहे."

आवेगासरशीं पद्माकर हें सारें बोलून गेला. पण आपण हें सारें बोललों कसें ! आणि दादानें तें निमूटपणें ऐकून घेतलें कसें, याचें त्याला आतां नवल वाटूं लागलें. दादाला आपलें म्हणणें पटलें कसें ? तसें असेल तर मात्र मोठाच चमत्कार म्हणावयाचा ! पण असा चमत्कार कांहीं घडून आला नाहीं हें त्याला कळून चुकलें. कपडे चढवून बाहेर जाता जातां यशवंत म्हणाला,

" पद्माकर, तुला वाटलें असेल कीं, तुझ्या या व्याख्यानाचा माझ्यावर कांहीं परिणाम झाला असेल तर तो तुझा भ्रम आहे. अशीं व्याख्यानें मी आजवर पुष्कळ ऐकलीं आहेत ! पुन्हां एकदां तुला बजावतों कीं असला बाष्कळपणा

तुम्हाला करावयाचा असेल तर माझ्या घरातून अगोदर चालते व्हा ! मग मन-सोक्त धागडधिंगा घालायला तुमचे तुम्ही मुखत्यार आहात ! "

यशवंत निघून गेल्यावर पद्माकरानें जवळच्या एका आराम खुर्चीवर आपले अंग टाकले. निशेच्या नशिबांत विधात्यानें आणखी काय काय लिहून ठेवले आहे याचा तो आपल्याशींच विचार करूं लागला. आताचें आपले व दादाचें बोलणें तिच्या कानावर गेलें असेल काय ? गेलें असल्यास तिच्या हळुवार मनाला केवढ्या बरें यातना झाल्या असतील ! या विचाराच्या तंद्रीत असतानांच त्याच्या कानांवर खालील शब्द पडले.

" पद्माकर, असा एकसारखा विचार करून, माझ्यासाठीं स्वतःच्या जीवाला विनाकारण त्रास करून कां बरें घेतोस ? " निशेचेच शब्द होते हे ? तिचे डोळे भरून आले.

" निशे, मला दादाच्या स्वभावाचें राहून राहून राहून फार नवल वाटतें ! तुझ्याबद्दल त्याला काहींच कसें वाटत नाहीं ? "

" नशिब माझें ! दुसरें काय ? पण आता त्याच्या रागाला भिऊन चालणे मला शक्य नाहीं. ज्या दिवशीं मीं माझें हृदयसर्वस्व अविनाशला अर्पण केलें, त्या दिवशींच या घराचा आणि माझा संबंध तुटल्यासारखा झाला. " बोलता बोलता ती एकदम स्तब्ध झाली. तिचे विचार हळुहळु मागील कालाकडे वळूं लागले. त्या गोड दिवसांची तिला आठवण झाली. त्या दिवशीं नेहमीं-प्रमाणेंच आपण अविनाशला अरे तुरे करून बोलत होतो. तोंच अविनाश थोडासा थट्टेनें म्हणाला, " निशे, आजपासून मला अरे तुरे नाहीं हो करायचं ? "

" म्हणजे आजपासून कुणीतरी मोठा माणूस झालास वाटतं तूं ? " तिनें विचारलं.

" हो फारच मोठा झालों आहे मी ? "

" अस्सं ! मग तुला काय म्हणायचं ? महाराज कीं युवराज ? "

" नुसतं पतिराज म्हटलं तरी पुष्कळ झालं ! "

" इश्श ! कायरे अविनाश तुझी ही भलतीच थट्टा ! " ती लटक्या रागानें म्हणाली. यावर त्यानें सारी हकिकत आपणाला कशी सांगितली, आपण परस्पराशीं वचनबद्ध कसें झालों, हा प्रसंग आणून दिल्याबद्दल पद्माकराचे

आपण मनांतल्या मनात कसे आभार मानले, या साऱ्या गोष्टी तिच्या नजरेसमो-रून एकामागून एक जाऊं लागल्या.

या सुखस्वप्नात मग्न असतानाच खालच्या मजल्यावरून कुणीतरी निरोप आणला, ' अविनाश सायकलवरून पडल्यामुळे त्याच्या पायाला इजा झालेली आहे. आपल्याला बोलावलं आहे. '

पद्माकर आणि निशा जवळ जवळ धांवतच अविनाशच्या खोलींत गेली. अविनाश कॉटवर कण्हत पडला होता. त्याचा पाय बराच मुरगळल्यासारखा दिसत होता.

पद्माकरानें लगेच जाऊन डॉक्टरला आणले. डॉक्टरनीं पाय तपासला. एक कसलेसे तेल त्यानीं पायाला चोळण्यास दिले आणि मधून मधून पाय शेक-ण्यास सांगून ते निघून गेले. मात्र तैलमर्दन आणि शेक हे उपचार जितक्या अधिक वेळा होतील त्या मानाने गुण अधिक लवकर येईल असे जातांना बजावण्यास ते चुकले नाहीत.

" निशे मग काय विचार आहे तुझा ?" पद्माकराने विचारलें.

" यांत विचार कसला ? डॉक्टरच्या सागण्याप्रमाणे व्यवस्था ठेवण्याचें काम माझ्याकडे लागले. "

" आणि दादाने विचारले तर त्याला काय उत्तर देशील ? "

" हात्तिच्या ! उत्तर न देता येण्यासारखा मी गुन्हा थोडाच करतें आहे एखाद्याचा ! आजारी माणसाची शुश्रुषा करणे हा गुन्हा कधींपासून झाला ? याची गणना पापांत कधींपासून होऊं लागली ? एखादी नर्स नाहीं का अनेक रोग्यांची शुश्रुषा करीत ? या तिच्या कृत्याला कोणी अनीति म्हणेल का ? मग येथें तर माझ्या जिव्हाळ्याचा, माझ्या भावी आयुष्याचा प्रश्न आहे ! उलट हें कर्तव्य बजावण्यांत मी कसूर केली मग मात्र मी पापाची धनीण होईन खरी ! "

पद्माकर आज नेहमींप्रमाणें बाहेर न जातां घरींच राहिला. दादा आल्यावर गडगडाट होणार हें तो पूर्णपणे समजून चुकला होता. आणि त्यालाही या गोष्टीचा एकदा केव्हांतरी सोक्षमोक्ष करावयाचाच होता.

यशवंत बाहेरून आला तो रागारागांतच ! मघाच्या रागाचा पारा अजून उतरला नाहीं हें पद्माकरानें जाणलें. या आगींत आतां तेल ओतावें लागून त्यामुळे जो भडका होईल त्याला तोंड देण्याची त्यानें तयारी चालविली.

बराच वेळ निशा न दिसल्यामुळें यशवंताला संशय आला. अविनाशच्या खोलींत ती क्वचितच कामासाठीं केव्हातरी जात असे ही बातमी त्याला लागली होती. पण ती बहुधा त्याच्या गैरहजेरींत जात असे आणि गेली तरी फार वेळ राहत नसे.

" निशा कुठें गेली ? " त्यानें रागांतच प्रश्न केला.

" खालीं गेली आहे ! " पद्माकरानें शांतपणें उत्तर दिलें.

" खालीं कोणाकडे ? " यशवंतानें मुद्दामच अज्ञान पांघरलें.

" सायकलवरून पडल्यामुळें अविनाशचा पाय दुखवला आहे—"

" तो चुरीत बसली असेल ! "

" पायाला शेक देणें अत्यंत जरूर आहे म्हणून डॉक्टरनीं—"

" त्याचा अर्थ तोच ! मला समजतात हीं सारीं ढोंगं, तुमची डोकींच बिघडून गेलेलीं दिसतात "

" दादा, पण यांत एवढें राग येण्यासारखं काय आहे रे ! "

" काय आहे ! काहींच का नाहीं ? पद्मा, असं विचारायला तुला कांहींच शरम वाटत नाही ? जाऊं दे, तुझ्याशीं अधिक वाद घालण्यात काहीं अर्थ नाही ! पण एवढें मात्र तुला सांगून ठेवतो कीं निशेला माझी खोली अगदीं या क्षणापासून वर्ज्य आहे. "

" मग दादा, तिला ही खोली जोपर्यंत वर्ज्य राहील, तोपर्यंत मलाही ती वर्ज्य आहे असें मी समजतों. " पद्माकर ठांसून म्हणाला.

" तरीही चालेल ! " यशवंताच्या तोंडून हे शब्द एकदम बाहेर पडले.



दुपारीं दोन अडीच वाजण्याचा सुमार ! निशा कांहींतरी शिवणकाम करीत खोलीच्या उंबरठयावर बसली होती. पद्माकर आणि अविनाश ऑफिसात गेले होते. यशवंतकडून निघाल्यापासून पद्माकरानें अविनाशच्याच खोलींत तात्पुरतें बिऱ्हाड ठोकलें होतें.

कुणाच्या तरी बुटाचा आवाज झालेला ऐकूं आल्यामुळें तिनें सहज त्या दिशेला पाहिलें. त्याचे नेहमीचे डॉक्टर जिना चढून वर जात होते. ती आपल्या जागेवरून उठली. चाळींत कुणाकडेही डॉक्टर आला कीं चाळीतील इतर माणसांच्या मनाचीही थोडीफार चलबिचल होत असते.

" कोण हो, कोण आजारी आहेत वरच्या मजल्यावर ? " तिनें सहजच कुतुहलानें एका बाईला विचारले.

" म्हणजे ? तुम्हाला खरोखरच माहित नाहीं कीं काय ? अहो, तुमचे यशवंतराव आज चारपाच दिवस तापानें आजारी आहेत ना ? ताप बिलकूल हटत नाही म्हणे ! बिचाऱ्याची बायको पण इकडे नाहीं. बाळंतपणासाठीं हल्लींच तिला माहेरी पाठविलीन् त्यानी ! "

त्या बाईच्या दर शब्दागणिक निशेचा अस्थिरपणा वाढत होता. या वेळीं आपले कर्तव्य काय याचा ती विचार करूं लागली. अशा स्थितीत मी वर गेलें तर दादाचा राग जीवंत होईल का, त्या रागाने त्याचा आजार वाढेल का, कीं आपण गेल्यावर त्याच्या जीवाला जरा बरे वाटेल ? तशा त्या परस्पर विरोधी विचाराचा निर्णय चालू असताच तिचे पाय आपोआप जिन्याकडे वळले. ती हळुहळु जिना चढून वर गेली आणि यशवंताच्या खोलीच्या दारात जाऊन उभी राहिली.

डॉक्टरची तपासणी संपताच ते बाहेर आले. बरोबरच्या गृहस्थाकडे वळून ते म्हणाले, "ताप लवकर हटेल असे वाटत नाहीं. मुदतीचा आहे तो ! किती दिवस घेईल ते काहीं सागता येणार नाहीं !—याच्या घरी सध्या कुणी बायको माणूस नाही का ? "

" आहे ! मी आहे ! काय सांगायचं आहे ? " निशेच्या तोंडून सहजगत्या हे उद्गार बाहेर पडले. डॉक्टरनीं मागे वळून पाहिले.

" ओहो ! तुम्हीं आहाना ? मग काय काळजीच करायला नको म्हणा ! हे पहा, घाबरण्यासारखं काही नाही ! पथ्यपाण्याची तेवढी काळजी घ्या म्हणजे झाले. "

डॉक्टर गेल्यावर निशेने खोलींत पाऊल टाकलें. किती किती दिवसांनीं आपण त्या खोलींत प्रवेश करीत आहों असा तिला भास झाला. बिछान्यावर निपचित पडलेल्या यशवंताला पाहून तिचे स्नेहार्द्र हृदय कळवळले.

त्या क्षणापासून निशेनें यशवंताच्या सेवेला स्वतःला जवळ जवळ वाहून घेतलें असें म्हटले तरी चालेल ! औषधपाणी, पथ्यापथ्य वगैरे ती काळजीपूर्वक पाहूं लागली. एक महिना उलटून गेला तरी ताप निघण्याचें काहीं चिन्ह दिसेना. या एका महिन्यात जेव्हा जेव्हा त्याचा ताप फार चढत असे त्या त्या वेळीं त्याला भ्रम होऊन त्या भ्रमांत तो बडबडत असे. आणि या बडबडण्यांत

निशेचेंच नांव तो वरचेवर घेत असे. ' निशे, तूं आलीस ? का आलीस ?—मला मारायला आलीस का ?—मला मारूं नकोस ! मला क्षमा कर ! ' हें किंवा अशासारखेंच काही तरी तो बडबडत असे.

तो जेव्हां शुद्धिवर असे त्यावेळीं निशा, पद्माकर आणि अविनाश डोळ्यांत तेल घालून आपली सेवा करीत असलेली तो पाही ! पण त्याच्याकडे सारखे बघत राहण्याखेरीज तो दुसरें काही करीत नसे.

बेचाळीसाव्या दिवशीं त्याचा ताप साफ काढला. त्या दिवसापासून हळुहळू त्याच्या प्रकृतीला आराम पडूं लागला.



यशवंत आता खोलींतल्या खोलींत हिंडू फिरूं लागला होता. त्या दिवशीं तो वेळ घालविण्यासाठीं काहीं तरी वाचीत पडला होता. वाचता वाचता त्याने सहज मान वर करून पाहिले. समोरच निशा उभी होती.

' दादा, तूं आता साफ बरा झालास ? मग मला आता निरोप द्यायला तुझी काहीं हरकत नाहींना ? " तिने विचारले.

तिच्या म्हणण्याचा भावार्थ यशवंताच्या तेव्हाच लक्षात आला.

" निशे, वेडे, कसला निरोप मागतेस ! हे घर तुझे नाहीं का ? माझ्या हातून तुझा मोठाच अपराध घडला आहे ! आणि त्याचे कारण हेच की तुझी खरी किमत मला मुळींच कळली नव्हती ! तुझ्याशीं होणाऱ्या माझ्या वर्तणुकीत अंतःकरणाच्या जिव्हाळ्याचा पूर्ण अभाव होता; म्हणूनच तुझ्या सुखदुःखाकडे, विकार विचारांकडे आपलेपणाच्या भावनेनें मी कधीच पाहिलें नाही ! हा सारा माझाच अपराध ! निशे, लवकरच अविनाश तुला आपली सहधर्मचारिणी करून इथून घेऊन जाणार आहे. तोपर्यंत तरी या तुझ्या दादाला सोडून तूं जाऊं नकोस !



# त्रिवेणीसंगम



" अग, प्रेमाचा प्रभाव आहे हा सारा ! दुसरं काय ? " एकजण म्हणाली.

" छे ग ! कसलं प्रेम नि कसलं काय घेऊन बसली आहेस ? हा सारा कावा आहे तिचा ! नवरा सुशिक्षित असला, तर संसारांत वादाचेच प्रसंग विशेष यावयाचे ! शिवाय त्यात स्वतःच्या सुशिक्षित्वाला ग्रहण लागण्याचाही बराचसा संभव ! त्यापेक्षां आपला फारसा न शिकलेला नवरा केला, कीं ज्यांत त्यांत आपला वरचष्मा राखायला फार सोपं ! असंच ना ग मंदे ? " दुसरीनें विचारलें.

" तुट्टू द्या ! तुट्टू द्या ! आपल्या अकलेचे तारे तुटतात तितके तुट्टू द्या ! काय चेष्टा चालविलीय् मघापासनं ? कुकुबाळच जशी कांहीं ! " मंदा किंचित् लटक्या रागानें म्हणाली.

" ही सारी चेष्टाच वाटते तुला, मंदे ? अग, आम्ही समाजातील एका जिव्हाळ्याच्या वादाला चालना देत आहोंत !–एवढंही समजू नये ना तुला ? " पहिली बोलली.

" खरंच ! " दुसरीनें टेंकू दिला, " सुशिक्षित पदवीधर मुलीनं अशिक्षित नवरा पसंत करावा कीं काय ?—याच गंभीर विषयावर आमचं बोलणं चाललं होतं ! "

" अस्सं ! " मंदा हंसून म्हणाली,–" पण तुम्हांला यांत एवढं गंभीर आणि गहन काय वाटतं तेंच मला कळत नाहीं. खऱ्या प्रेमानं बद्ध झालेल्या दोन हृदयांत अशा तऱ्हेचे विकल्प येणं शक्य आहे का ? दुसऱ्याच्या सुखासाठीं आपल्या सुखावर, आपल्या आवडीनिवडीवर पाणी सोडायला तयार होणं यांतच प्रेमाची खरी मातब्बरी दिसून येते, असं नाहीं का तुम्हाला वाटत ? असं ज्यांना वाटत नाहीं–त्याग हाच खऱ्या प्रीतीचा उगम आहे हें तत्त्वच ज्याला पटत नाहीं, त्याला सुशिक्षित तरी कां म्हणावं ? त्याच्या नांवापुढं पदव्यांचं केवढंही लटांबर असलं, तरी सुज्ञ माणसं अशाची गणना अशिक्षितांतच करणार नाहींत का ? "

" बाई, बाई! मंदे, डॉक्टरच्या परीक्षेला अलीकडे 'फिलॉसफी' हा विषय लावण्यांत आलाय् कीं काय? बाकी मंदे, अलीकडे प्रेमाचं हें शास्त्र फारच सवंग विकूं लागलेलं दिसतं! अमुक हें असं का? म्हणून कुणी विचारलं, कीं लगेच आमचं दोघांचं एकमेकावर प्रेम आहे म्हणून खुशाल दडपून द्यावं! सारी विषमता, सारे अन्याय, सारी अनीति आणि सारा अधर्म या प्रेमाच्या पांघरुणाखालीं सहज झाकला जातो आणि शिवाय वर आपल्या प्रेमळपणाचा दिमाख मिरवायला मिळतो तो निराळाच! जमल्यास समाजाच्या विचारांत क्रांति घडवून यावी म्हणून ही नवी नीति स्वतःच्या आचरणांत आणून समाजाला " धक्के " देण्याचं भारी बिकट, अप्रिय आणि कटु कर्तव्य आपल्याला अगदी नाईलाजानं करावं लागत आहे असं म्हटलं, कीं एकाच दगडानं अनेक पक्षी मारल्याचं श्रेयही अनायासें पदरात पडेल! "

" अहो बाईसाहेब, आपण व्यासपीठावर उभ्या नाही राहिलेल्या, हें ध्यानांत आहे ना?" प्रकरण वाढत चाललेलें पाहून पहिली म्हणाली.

" बोलूं दे ग तिला!—तिच्या म्हणण्यांत झाला तरी बराच सत्यांश आहे हें कबूल केलं पाहिजे. प्रेमाच्या नावाखालीं कसे अत्याचार केले जातात याचीं अगदीं ताजीं उदाहरणं तर आपल्या डोळ्यांपुढेच आहेत ना? मग? "

मंदेचें घर जवळ आलेलें पाहून दोघी मैत्रिणींनी तिचा निरोप घेतला. मंदा हळूहळू जिना चढून वर गेली. डॉक्टरची परीक्षा पास झालेल्या आपल्यासारख्या विदुषीनें अशोकसारख्या साधारण मॅट्रिक् झालेल्या तरुणाशी विवाहबद्ध होण्यास कबुली देणें ही गोष्ट तिच्या अनेक मैत्रिणींत खळबळ उडवून देण्यास पुरेशी होती. या बाबतींत उलटसुलट टीकेचे घाव तिनें आतांपर्यंत कमी सोसले होते असें नाहीं. पण हे सर्व घाव तिनें इतक्या लीलेनें सहन केले कीं, त्यांपैकीं एकही घाव तिच्या हृदयाला जखम करूं शकला नाहीं. 'अशोकच्या दिलदार आणि प्रेमळ स्वभावाची जर यांना कल्पना असती, अगर त्याच्यावरील माझ्या गाढ प्रेमाची अंधुकशी जरी यांना जाणीव असती, तर यांनी आपल्या स्वैर जिव्हांना कधींच आळा घातला असता!' तिनें आपल्या मनाशीच म्हटलें.

तिच्यापूर्वी पाचदहा मिनिटें आलेला अशोक तिची वाट पाहत गॅलरींत उभा होता. मंदा किंचित् ओशाळल्यासारखी झाली. लगबगीनें दार उघडीत तिनें विचारलें,

" कितीसा वेळ झाला येऊन ?—फार नाहीं ना वाट पाहावी लागली ?"

" आणि लागली तरी त्यांत काय बिघडलं ? विरहाप्रमाणे औत्सुक्य हेंही प्रेमाच्या वृद्धीला कारणीभूत होतं हें माहीत आहे ना तुला, मंदे ! "

" प्रेमाची अभिवृद्धि अशा बाह्य परिस्थितीवर अवलंबून ठेवणं कितीसं शहाणपणाचं होईल याची मला शंका वाटते. हृदयांत प्रेमाची वाढ स्वाभाविक रीत्याच होणं अधिक इष्ट नाहीं का ? "

" पण त्या स्वाभाविक वाढीला झाली तरी परिस्थितीच्या उन्हापावसाची सारखीच जरूरी असते !—पण तें जाऊंदे तूर्त !-मग काय ठरविलास पुढील बेत?"

" थोडासा आपल्या मर्जीविरुद्धच ठरविला आहे म्हणा ना ! "

" हं, म्हणजे ? दवाखाना उघडायचा तुझा बेत नक्कीच झाला म्हणायचा!"

" हो ! जवळ जवळ तसंच ! सध्याच्या हॉस्पिटलमध्यें आणखी थोडे दिवस काम करून थोडासा अनुभव आणि बराचसा आत्मविश्वास संपादन केला, कीं स्वतःच्या हिंमतीवर दवाखाना उघडायला कांहीं हरकत नाहीं असं मला वाटतें. आणि दवाखान्याचं बस्तान एकदा नीट बसलं कीं—"

" विवाहाचा विचार करायचा, असंच ना ?— मंदे विवाहाची मी तुला घाई करीत नाही; पण या दवाखान्याच्या फंदात तूं पडूं नयेस असं मला वाटतं. तुझी सध्यांची हॉस्पिटलमधील नोकरी उत्तम आहे. ईश्वराच्या दयेनं माझी सापत्तिक स्थिती चागली आहे. मग दवाखान्याचं बंधन स्वतःवर लादून घेण्यात काय अर्थ आहे ? या दवाखान्याच्या वाढत्या व्यापामुळ आपल्या संसारांत अनेक अडथळे येतील असं नाहीं का तुला वाटत ? "

" आपलं म्हणणं मला पटतं ! पण स्वतंत्र रीतीने दवाखाना घातल्यानं मला जशी दीनदुबळ्यांची सेवा करता येईल, तशी ती हॉस्पिटलात नोकरी पत्करल्यानं करतां येईल का ? "

" तितक्या प्रमाणात नसली, तरी बऱ्याच प्रमाणांत तुला तशी सेवा करतां येण्यासारखी आहे. शिवाय, एकदां विवाहाचं बंधन स्वखुषीनं आपल्यावर लादून घेतल्यावर संसाराकडे पूर्णपणें दुर्लक्ष करणं हें चागलं का ? अशा माणसानं लग्नाच्या फंदांत पडूंच नये हे उत्तम ! " त्यानें शेवटीं उच्चारलेल्या शब्दांत असलेली वैतागाची छटा मंदेच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं.

" हं ! राग आला वाटतं ?—प्रेमाच्या वृद्धीवर आतांच झोडलेलं व्याख्यान

इतक्यातच विसरलात म्हणायचं ?—खरं सांगू का ? मी हें सगळं आपली परीक्षा पाहावी एवढ्याच हेतूनं बोललें; तसं पाहिलं तर मी आपल्या शब्दाबाहेर का आहें ?"



चष्म्याची केस ठेवण्यासाठीं अशोकनें टेबलाचा खण उघडला. कोणीतरी खणांतील कागदपत्र अस्ताव्यस्त करून टाकले होते. कपाळाला एकदोन बारिकशा आंठ्या घालून खणांतील सामान नीट रचून ठेवण्याच्या उद्योगास तो लागला. तोंडानें शीळ घालीत त्यानें आपले काम चालू ठेवलें होतें. आज तो अतिशय आनंदांत असलेला दिसत होता, आणि मंदेचें त्याच्यावरील अनुपम प्रेम हेंच त्याच्या आनंदाचें एकमेव कारण होतें; पण त्याचा हा आनंद एकजिनसी मात्र नव्हता. सूक्ष्म दृष्टीनें पाहणाऱ्यास मध्येच तो एकाएकीं खिन्न झाल्यासारखा, आणि मग बराच वेळ आपल्याच विचारात गढून गेल्यासारखा दिसला असता ! मंदेच्या प्रेमाची सखोलता पाहण्याचे आजवर अनेक प्रसंग आले होते. या सर्व प्रसंगांत तिचें प्रेम चांगलेंच तावूनसुलाखून निघालें होतें. आता आणखी एकच प्रसंग—आणि तोच त्याला सर्वांत भयंकर वाटत होता—यावयाचा होता !—याही प्रसंगांत ती पूर्वीप्रमाणेंच आपल्या कसोटीला उतरेल का ? कीं आतापर्यंत खेळलेला प्रेमाचा सारा डाव ती एकदम उधळून लावील ? ती गोष्ट अशीच होती कीं, ती समजतांच आपल्याविषयीच्या साऱ्या कोमल भावना निमिषार्धांत जळून खाक व्हावयाच्या ! प्रेमाच्या जागेवर तिरस्काराचें साम्राज्य पसरावयाचें ! आणि—त्याला ती कल्पनाही असह्य झाली ! नाहीं ! असें घडून येतां कामा नये ! आपल्या साऱ्या सुखाचा मेरु असा एकाएकीं ढांसळूं द्यावयाचा की काय ? त्यापेक्षा—त्यापेक्षां लग्न होईपर्यंत ही गोष्ट तिच्यापासून गुप्तच ठेवली तर !—"

हातांतील कागदातून फटकन् कांहींतरी पडल्याचा आवाज झाला. पडलेली वस्तु त्यानें वर उचलली !—त्याच्या काळजांत धस्स झालें !

त्याच्या हातांतून ती वस्तू एकाएकीं गळून खालीं पडली. सहा वर्षांपूर्वी काढलेला त्याच्या पत्नीचा–त्यानें त्याग केलेल्या पत्नीचा तो फोटो होता !

आपलें लग्न झालें आहे ही बातमी मंदाला कळून आल्यास केवढा अनर्थ होईल ! पण ही बातमी चोरून तरी कशी ठेवायची ! आज ना उद्यां कोणाकडून

ना कोणाकडून तिला ही बातमी कळणारच ! त्यापेक्षा आपणहूनच सर्व हकीकत तिला अगोदरच कळविणें इष्ट ! आज ना उद्यां करतां करता इतके दिवस निघून गेले होते. पण ही गोष्ट मंदेला उघड करून सांगण्याचें धैर्य त्याला अजून झालें नव्हतें. या बाबतींत शक्य तितके कालहरण करण्याचाच क्रम त्यानें चालू ठेवला होता.

पडलेला फोटो उचलून घेतां घेतां त्याच्या मनात निराळेच विचार सुरू झाले. सहा वर्षांपूर्वी " धर्मे च अर्थे च कामे च—" अशी जिच्यापाशीं आपण शपथ वाहिली, तीच ही आपल्याशीं विवाहविधीनें बद्ध झालेली आपली कुसुम ! विवाहानंतर सहा महिनेच जेमतेम आपण एकत्र घालविले असतील ! आणि मग–तिच्या साध्या आणि भोळसट वागणुकीचा आपल्याला कंटाळा आला, ती आपल्याला आवडेनाशी झाली. एक दिवस असेंच काहीतरी निमित्त काढून आपण तिची माहेरीं रवानगी करून दिली. आणि—आपल्या मुलीच्या शीलाबद्दल संशय उत्पन्न करण्यासारखे प्रसंग नजरेस पडल्याने तिला मी आपल्याकडे पाठवीत आहे, असें खोटेंच काही तरी आपण तिच्या वडिलाना लिहून पाठविलें. त्या वेळेपासून या क्षणापर्यंत आपण तिची एकदाही वास्तपुस्त केली नाही. हीं सहा वर्षे तिने कशी काढलीं असतील याचा आपण नुसता विचारही मनांत येऊं दिला नाहीं !—

ही सारी हकीकत मंदेला कळली—आपल्या हृदयाच्या या कठोरपणाची तिला जाणीव झाली तर–तर–त्याने आपले डोकें दोन्ही हातानीं घट्ट दाबून धरलें. विचाराचा भार त्याला असह्य झाला.



मंदेची हॉस्पिटलमधून सुटण्याची वेळ झाली, कीं अशोकनें तिकडे जावयाचें आणि मग दोघानीं मिळून कोठें तरी फिरावयाला जावयाचें, हा त्याचा नेहमींचा क्रम ! याच क्रमानुसार आजही तो ठरलेल्या वेळीं हॉस्पिटलात आला. पण आज अजून मंदेची मोकळीक झाली नव्हती. बराच वेळ वाट पाहून थकल्यावर त्यानें मंदेला निरोप पाठविला. मंदेनें त्याला आंत बोलावले आणि ती बसली होती त्या खोलीला अगदीं लागूनच असलेल्या लहानशा गॅलरींत एक खुर्ची टाकून, थोडा वेळ बसण्याची त्याला सूचना दिली.

पंधरा-वीस मिनिटें तेथें बसल्यावर अशोक कंटाळला. मंदा काय करीत आहे

त्याचा कानोसा घ्यावा म्हणून हळूच त्यानें बाजूच्या खिडकीचा पडदा दूर करून आत डोकावले. एक स्त्री-पेशन्ट मंदेला कसली तरी हकीकत अगदीं जिव्हाळ्यानें सांगत होती. आणि मंदाही अत्यंत एकाग्रतेनें तिची हकीकत ऐकण्यांत चूर होऊन गेली होती. अशोकने खिडकींतून आंत डोकावण्यास आणि त्या स्त्री-पेशन्टनें आपलें तोंड बाजूला वळविण्यास एकच गांठ पडली. तिच्या चेहऱ्यावर नजर गेली मात्र—अशोक एकदम चमकून मागें सरला ! त्याची छाती धाड्-धाड् उडूं लागली. मुद्देमालासकट चोराला पकडल्यावर त्याची जशी असहाय्य स्थिति होते, त्याच स्थितींत तो सापडला. काय करावें तें न सुचल्यामुळें क्षणभर तो दिङ्मूढ झाला.

"—त्यानीं माझा त्याग केला याचं मला एवढं वाईट वाटत नाहीं हो ! " त्या स्त्रीचें बोलणें अशोकला स्पष्टपणें ऐकूं येत होतें. " पण वाईट वाटतं तें एवढंच, कीं माझं त्याच्याशी वर्तन इतकं चोख असतांही माझ्या शीलाविषयीं त्यांनीं संशय प्रदर्शित केला ! खुद्द नवऱ्यानंच असा संशय प्रकट केल्यावर पराचा पारवा करायची संवय असलेल्या लोकांनीं माझ्या अब्रूचे कसे धिंडवडे काढले असतील याची कल्पनाच करा तुम्ही, बाई ! "

" नवऱ्यानं 'टाकलेल्या' बायकाकडे आपला समाज कोणत्या नजरेनं पाहतो, त्याची कसकशी विटंबना करतो, याचं वर्णन करायचं म्हटलं तर एक रामायणच होईल मोठं ! डोळे असून पाहायचं नाहीं, कान असून ऐकायचं नाहीं, अशी चमत्कारिक स्थिति असते त्याची ! जो तो त्यांच्याकडे साशंक नजरेनं पाहणार ! 'दैवाचा कोप' म्हणून विधवाना जी थोडीबहुत सहानुभूति मिळते, तेवढीसुद्धा आमच्या वांट्याला येत नाहीं ? अमुक एका स्त्रीला नवऱ्यानं टाकली आहे ना ? मग ती वाईट चालीची असलीच पाहिजे, तिचं कुठं तरी वांकडं पाऊल पडलंच असलं पाहिजे, अशी आमचा समाज आपली ठाम समजूत करून घेत असतो. एवढा यांचा पुरुषजातीवर अंधविश्वास असतो ! पुरुष दोषी असेल, त्याच्या हातून कांहीं अन्याय घडला असेल, असं यांना स्वप्नांतही वाटत नाहीं ! मग खुद्द नवऱ्यानंच दुर्वर्तनी ठरविलेल्या स्त्रीची समाज कोणत्या रीतीनं संभावना करील तें तुम्हीच पाहा ! आम्हां टाकलेल्या बायकांचा प्रश्न सोडवण्याचा प्रयत्न करणारीं चार दोन पुस्तकं माझ्या वाचनांत आलीं आहेत ! पण या पुस्तकांच्या लेखक-लेखिकापैकीं बहुतेकांनीं आमच्या मनो-

विकारांचा जो कोंडमारा होतो, त्यावरच विशेष भर दिलेला आढळून येतो. पण खरं सांगायचं, म्हणजे या गोष्टीला आम्ही गौण मानतों. यापेक्षां आमच्या नाजूक मृदु भावनांची जी गळचेपी केली जाते—समाजाच्या अवहेलनात्मक छळामुळं आम्हाला जो मानसिक त्रास सोसावा लागतो—नाना तऱ्हेच्या अपमानाचे विंचू डसून आमच्या मनाला ज्या वेदना होतात, त्यानींच आमच्या आयुष्याची धूळधाण होते. त्याचमुळं मृत्यूला कवटाळण्याला आम्हीं अगदीं एका पायावर नेहमीच तयार असतों !—म्हणून तुम्हाला सागतें, कीं माझ्या नातलगानी मला इकडे आणून टाकली असली, तरी मला यातून वाचविण्याची बिलकूल खटपट करूं नका ! मृत्यु हाच माझा आतां एकमेव आधार आहे ! तेवढा तरी माझ्यापासून हिरावून घेऊं नका, एवढीच माझी आपल्याला हात जोडून प्रार्थना आहे.—"

मंदा आणि अशोक जिन्याच्या पायऱ्या उतरून खालीं आलीं.

" समुद्रावर चलायचं का ? " मंदेनें विचारले.

" हं. " अशोक खालच्या मानेनेच म्हणाला. बराच वेळपर्यंत कोणीच कोणाशीं बोलले नाही. मंदेच्या डोक्यात त्या दुर्दैवी स्त्रीबद्दलचेच विचार घोळत होते. कांहींच कारण नसतांना पत्नीचा त्याग ! इतके पुरुष कठोरहृदयी होऊं शकतात तरी कसे, याचेच तिला आश्चर्य वाटत होतें. अशोकच्या डोक्यात तर विचाराची सारखी धुमश्चक्री चालू होती. इकडे आड, तिकडे विहीर अशा पेंचात तो सापडला होता. मंदेला आपले खेरे स्वरूप समजून येण्यास आता अधिक वेळ लागणार नाहीं हे नक्की ! मग त्यापूर्वींच आपण होऊन तिच्याजवळ साऱ्या गोष्टींचा खुलासा करणे बरें नव्हे का ? पण या विचाराच्या जोडीनेच दुसराही एक विचार त्याच्या मनावर हळूहळू पगडा बसवीत होता. पत्नीच्या बाबतींत घडलेल्या अन्यायाची तीव्रता त्याच्या मनाला अधिकाधिक जाणवूं लागली होती. ती इतकीं कीं, झालेल्या अन्यायाचें परिमार्जन करण्यासाठीं कुसुमला घेऊन पुनः संसार थाटावा असेंही एकदोनदा त्याच्या मनात येऊन गेलें. पण ते क्षणभरच ! मंदेच्या सहवाससुखाला हपापलेल्या त्याच्या मनांत पत्नीची स्मृति फार वेळ टिकून राहणें शक्यच नव्हतें. इतक्या सहजासहजीं विसरून जाण्यासारखें मंदेवरील त्याचें प्रेम उथळ नव्हतें खास !

" मघांपासून त्या बाईचेच सारखे विचार येताहेत मनात ! ऐकली ना तिची हकिकत ? " मंदेनें शातताभंग केला.

" हो, " अशोकनें एक आवंढा गिळून उत्तर दिलें. " मंदा, किती दिवस सांगेन सांगेन म्हणतों—पण अजूनही धीर होत नाहीं ! "

अशोकचें तें अगदींच अनपेक्षित बोलणें ऐकून मंदा आश्चर्यानें त्याच्या तोंडाकडे सारखी पाहतच राहिली !

" मंदे, माझं—लग्न झालेलं आहे !—माझी पत्नी जिवंत आहे ! "

एकाएकीं वीजेचा तीव्र झटका बसावा त्याप्रमाणें मंदेची स्थिति झाली. क्षण-भर तिच्या तोंडून शब्दच फुटेना !

" मंदे, अशी बुचकळ्यांत पडूं नकोस ! मी सांगतों यांतील एक अक्षरही खोटं नाहीं. मंदा, माझं लग्न झालेलं असून जिनं थोड्याच वेळापूर्वी आपली कर्मकहाणी तुला सागितली, ती माझी पत्नी होय ! "

मंदेच्या आश्चर्याला आतां सीमाच नाहींशी झाली !

" मग तुम्ही मला ही गोष्ट अगोदरच का नाहीं कळवलीत ? या घटकेपर्यंत माझ्यापासून ही गोष्ट लपवून ठेवून आपण मला का बरं फशीं पाडलंत ? " मंदेला जवळ जवळ रडूंच कोसळलें.

" मंदे, मी तुला यापूर्वीच ही गोष्ट कळवायला हवी होती हें खरं ! पण तसं करायचा मला धीरच होत नसे त्याला मी काय करूं ? "

" अशोक, अशोक, एका जीवाच्या आयुष्याची राखरांगोळी करून आपली तृप्ति झाली नाहीं म्हणून का हो तुम्ही दुसऱ्या एका जीवाच्या आयुष्याचं मातेरं करायला तयार झालांत ? "

" मंदे, मला क्षमा कर ! तुझा विश्वासघात करावा, ही कल्पनाही कधीं माझ्या मनाला शिवली नाहीं !—मंदे, आतां साऱ्या गोष्टी तुझ्यापुढं मांडलेल्या आहेत ! तूं सागशील तसं वागायला मी तयार आहे. '

" अशोक, मला जाणूनबुजून फसवण्याचा तुमचा उद्देश नसेल हें मी कबूल करतें. पण तें कसंही असलं, तरी तूर्त परिस्थितीनं असं दारुण स्वरूप धारण केलं आहे, कीं तुमच्याशीं असलेला माझा संबंध तोडून टाकणंच इष्ट आहे !—अशोक, आपण विवाहित आहांत हें ऐकतांच माझ्या हृदयांतील प्रेमसागर तत्काळ आटून जाण्याइतका तो उथळ नाहीं ! पण आपल्या आणि आपल्या पत्नीच्या

सुखाकडे पाहायचं झाल्यास आपण मला विसरून जावं हेंच योग्य ! अशोक, तुम्ही पत्नीला घेऊन खुशाल संसार करा—त्यातच मला खरा आनंद वाटेल ! ”



“ कुसुम ! ”

अत्यंत प्रेमानें मारलेली ती हांक ऐकून कुसुमनें डोळे उघडून पाहिलें. तिचा आपल्या डोळ्यांवर काहीं केल्या विश्वासच बसेना ! आज सहा वर्षें आपली विचारपूसही न करणारे आपले पतिराजच आज आपल्याला इतक्या प्रेमानें हांक मारीत आहेत का ?

“ कुसुम, मी तुला घरीं न्यायला आलों आहें ! ”

आता तर तिच्या आश्चर्याची परमावधिच झाली. आनंदातिशयामुळे तिच्या तोंडून शब्दच बाहेर पडेना.

अशोकने तिच्याजवळ आपले अंतःकरण पूर्णपणें मोकळें केलें. तिच्यापासून त्यानें काहीसुद्धा चोरून ठेवलें नाहीं.

“ मग, चलतेस ना घरीं ? ” अशोकनें शेवटी विचारलें.

“ हो, पण एका अटीवर ! ” कुसुम हंसत हंसत म्हणाली.

“ ती कोणती ? ”

“ मंदेशी विवाह करायचं आपण कबूल करीत असाल तरच—”

“ वा ! सवतीची आवड असलेली स्त्री अशी आज तूंच भेटलीस पहिल्यांदा मला ! ”

“ जगाच्या दृष्टीनं ती माझी सवत होईल ! पण आमच्या अंतःकरणाच्या दृष्टीनं पाहिल्यास आम्ही दोघी बहिणी बहिणीच होऊन राहू ! ”

“ पण मंदा या गोष्टीला कबूल होईल का ? ”

पण कुसुमनें या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वीच मंदा आपली नेहमींची ड्यूटी बजावण्यासाठीं तेथें आली. या दोघांना बोलतांना पाहून ती मागें फिरण्याच्या बेतांत होती, तोंच कुसुमनें तिला हांक मारून जवळ बोलावलें.

“ काय, कसं वाटतं आज तुम्हांला ? ” मंदेनें चौकशी केली.

“ आज मला फारच बरं वाटत आहे. ”

" लवकरच बऱ्या व्हा ! आणि आपल्या विसकटलेल्या संसाराची घडी नीट करायच्या मार्गाला लागा ! " मंदेच्या शब्दात प्रेमळपणा ओतप्रोत भरला होता.

" मंदाकिनीबाई, माझा संसार सुखाचा व्हावा अशी आपली मनापासून इच्छा आहे का ? " कुसुमनें विचारलें.

" ईश्वराला स्मरून सांगतें, कीं आपणां दोघाना सुखात असलेलं पाहिलं की माझ्या मनाला समाधान वाटेल ! "

" मग तसं करण्यात मला आपण हातभार लावाल का ? "

" अगदीं अवश्य ! " मंदा बोलून गेली.

" मग आतांच याना जी मी एक अट घातली, तीच तुम्हालाही घालतें—मंदाकिनीबाई, तुम्ही दोघंही एकमेकांशीं विवाहबद्ध झाल्याशिवाय मला संसारांत मुळींच सुख होणार नाहीं.—ह्यांची या गोष्टीला संमति आहे.—आपलीही संमति आहे असंच समजूं ना ? "

कुसुम आणि अशोक—दोघाचीही दृष्टि एकदम मंदेच्या चेहऱ्याकडे गेली—

मंदेच्या चेहऱ्यावर उठलेल्या त्या वेळच्या त्या विविध मनोरम छटानीं त्या दोघांनाही हवी होती ती संमति दिली.



# मृत्युशय्येवरून-!



१९६० सालात जून महिन्यात घडलेली हकीगत ! ?



" शुं: ! केवढया मोठयानें ओरडतोस रे दिनू ! आईने सांगितलेले विसरून गेलास वाटतं इतक्यातच !"

दिनूनें आपली बालजीभ किंचित् चावल्यासारखी केली. नकळत झालेल्या कायदेभंगाबद्दल जणूं काय प्रायश्चितच घेतलं !

कुणीही मोठ्यानें बोलायचं नाहीं, आरडाओरड करायची नाहीं, अशी त्यांच्या आईने त्याना आज ताकीद देऊन ठेवली होती. आणि मुलेंही आपल्याकडून होईल तेवढी शिकस्त करून ही माताज्ञा अमलांत आणण्याचा प्रयत्न करीत होतीं.

वास्तविक ते घर म्हणजे सदा मुलामुलींनी गजबजलेलें असावयाचें. विलेपार्ल्याच्या त्या टापूंतील बहुतेक लहान लहान मुलांचें तें घर म्हणजे एक हक्काचें क्रीडाभूवनच बनून गेले होतें. त्याचे कारण त्या घरातील माणसांचा प्रेमळपणा आणि लहान मुलाकडे असणारा ओढा हें तर होतेंच, पण त्यातल्या त्यांत आपल्या विनोदप्रिय आणि लाघवी स्वभावाने मुलांचीं मनें आपल्याकडे आकर्षून घेणाऱ्या श्रीधरकाकाकडेच याचें बहुतेक श्रेय जात असे. आजूबाजूच्या घरांतील बाळगोपाळ गोळा करावयाचे; त्यांच्या बालबुद्धीला पटतील अशा गोष्टी आपल्या विनोदगर्भ भाषेनें सांगून त्याना हंसवायचें, पण त्याच्या ज्ञानात थोडी फार भर पडल्याची त्यांना जाणीव करून द्यावयाची; निरनिराळ्या तऱ्हेचे खेळ आपल्या डोक्यांतून शोधून काढून त्याची सात्त्विक करमणूक करावयाची; एक ना दोन ! अशा नाना प्रकारच्या गोष्टींनीं साऱ्या मुलाचीं बालहृदये त्यांनीं आपल्याकडे खेचून घेतलीं होतीं.

पण आज त्याच घरात निःशब्द स्तब्धता पसरलेली होती. ह्याचा अर्थ

नेहमींप्रमाणें आज मुलांचा घोळका तिथें जमला नव्हता. असें नाहीं. तर नेहमीं-प्रमाणें आज त्यांच्या जिभांचा स्वैर-संचार चालू नव्हता दोन. अगर तीन मुलांचा एक एक गट करून तीं मुलें आपसांतच फक्त एकमेकांना ऐकूं जावें एवढ्या बेतानेंच कांहींतरी कुजबुजत उभीं होतीं.—त्यांच्या मनांतील कावरे-बावरेपणा त्यांच्या चेहेऱ्यावर प्रतिबिंबित झालेला स्पष्ट दिसत होता. आरंभीं झालेला संवाद हा खुद्द त्या घरांतील दोघां मुलांत घडला.

आणि या औदासिन्यास कारण म्हणजे मुलांचे "प्राण" श्रीधरकाका मृत्युशय्येवर पडले होते.

तें घर श्रीधरकाकांचें नव्हतें—श्रीधरकाकांना घरच नव्हतें.—तें त्यांच्या एका मित्राचें घर होतें. आज कित्येक वर्षे ते आपल्या या प्रेमळ मित्राच्या घरींच राहत असत. त्यांचा संसार—पण जाऊं दे—तें रामायण आतांच कशाला?

बाहेर मुलात बराच वेळ चुळबुळ चुळबुळ चालली होती. एखाद्या परिक्षेचा निकाल ऐकण्यास विद्यार्थ्यांचीं मनें जितकी आतुर झालेलीं असतात तितकींच तीं बालमनें, "काका केव्हां बरे होतील?" या प्रश्नाचें उत्तर ऐकण्यास आतुर झालेलीं दिसत होतीं. पण या बिकट प्रश्नाचें उत्तर देण्याचें सामर्थ्य कुणांत होतें?

बऱ्याच वेळानें शारदा नर्स बाहेर आली. मुलांनीं लागलीच तिच्याभोंवतीं घोळका केला. काकांविषयींची कांहींना कांहीं आशाजनक बातमी आपल्याला ऐकावयाला मिळेल या आशेनें जो तो पुढें पुढें करूं लागला.

"मुलांनो आतां तुम्ही घरीं जा! तुमच्या काकाना चागली झोंप लागली आहे. आतां ते लवकरच बरे होतील! अन् मग तुमच्याबरोबर खेळायला पण येतील!"

मुलांना आनंद झाल्यासारखा दिसला. त्या आनंदांतच तीं हळुहळू आपापल्या घरीं परतलीं.

लहान मुलांची समजूत किती लवकर घालतां येते! पण मोठ्या माणसांचें तसें नसतें. खुद्द शारदाबाईनाही श्रीधरकाकांच्या जिविताविषयीं फारशी आशा नव्हती.

श्रीधरकाकाच्या पथ्यपाण्यांत काडीचीही कसूर होऊं नये म्हणून त्यांच्या मित्रानें मुद्दाम ही नर्स त्याच्या तैनातीला ठेवली होती. या बाबतींत तो खरो-खरच पाण्यासारखा पैसा खर्च करीत होता. श्रीधरकाकांनीं इतक्यांत इहलोकची यात्रा संपवूं नये अशी सर्वांचीच फार इच्छा होती. पण—



पहांटेस तिहींच्या सुमारास काका जागे झाले. आजच्यासारखी निवांत झोंप या आजारात त्याना कधींच लागली नव्हती. काकांना फार दिवसांनीं अशी सुश्रात झोप लागल्यामुळें घरांतील सर्व मंडळीहि आज निर्धास्तपणें निद्रा-देवीच्या आहारी गेलीं होतीं. काकानीं जागे होतांच एकदोनदां आपल्या डोळ्यांची उघडझाप केली, आणि ते हळुहळू या कुशीवरून त्या कुशीवर झाले.

दिव्याच्या मंद प्रकाशांत कसलेंसें पुस्तक वाचीत जवळ बसलेल्या शारदा-बाईनी त्याची चाहूल ऐकून पुस्तक बाजूला ठेवलें आणि ती पुढें झाली.

" कोण–शारदाबाई ? " काकानी मंद स्वरात विचारलें.

" हो, मीच ती ! पण तुम्ही आता फार बोलूं नका ! ज्यास्त बोलण्याइतकें त्राण राहिलें नाही तुमच्यात ! "

काकांनीं हंसल्यासारखें केलें.

" शारदाबाई, मी आता थोड्याच दिवसाचा सोबती आहे हें मला कळून चुकलें आहे. मग मला मनसोक्त बोलून घ्यायला तरी काय हरकत आहे ?— शिवाय आज पुष्कळ दिवसानीं चागली झोंप लागल्यामुळें मला आज हुषारी वाटत आहे.—शारदाबाई—"

" काय ? "

काका एक मिनिटभर कांहींच बोलले नाहींत. त्यांच्या डोळ्यांत हळुहळू पाणी सांचत होते.

" शारदाबाई तुम्ही नर्स आहांत ! शुश्रुषा करणें हा तुमचा व्यवसायच आहे. तरी पण माझ्या बाबतींत आपण जी तत्परता दाखविलीत, जी मेहनत घेतलीत ती पाहून फार फार दिवसांपूर्वींच्या–वर्षापूर्वींच्या म्हणा हवें तर–एका जुन्या आठवणीने माझें अंतःकरण भरून येतें—"

" पण कृपा करून आतां अधिक बोलूं नका! बोलतांना तुम्हांला किती श्रम पडत आहेत तें पाहतां ना ? "

" शारदाबाई, आतांपर्यंत—अगदीं या घटकेपर्यंत तुम्ही सांगाल तसतसा मी वागत आलों. तुमच्या कुठल्याही गोष्टीला मी प्रतिकार केला नाहीं. पण आज मात्र कुणाचेंच ऐकणार नाही. मनाला वाटेल तें ते सर्व काही बोलून टाकावें असा मी निश्चयच केला आहे आज ! "

नंतर थोडा वेळ थांबून ते म्हणाले.—

" माझ्या गतायुष्यातील गोष्टीविषयीं मी सहसा कुणाजवळ फारसे बोललों नाहीं. आपल्या दुःखाच्या कहाण्या लोकांना सागून उगाच त्याच्या आनंदी जीवनांत विष कां कालवा ?—अशा मताचा मी आहे. पण आजारात तुमचा सहवास घडतांच माझ्या आयुष्यांतील गोष्टी एखाद्या चलचित्रपटाप्रमाणें डोळ्या-समोर सारख्या दिसूं लागल्या. तुमचें अंतःकरण अतिशय कोमल आहे असें मला दिसून आलें. माझ्या बारिक सारिक गरजादेखील तुम्ही ज्या दक्षतेनें पुरवता त्यावरून जशा अंतःकरणाची मी आजवर अपेक्षा करीत होतों तसेंच अंतःकरण तुमच्यापाशीं असल्याची माझी खात्री झाली आणि मरणापूर्वी मना-तील खळबळ ओकून टाकण्यास हेंच एक स्थान योग्य आहे ही खूणगाठ मी मनाशीं बांधली. "

इतकें बोलून ते किंचित्काल स्तब्ध राहिले.

थोडया वेळानें ते पुन्हा बोलूं लागले.

"—माझी स्थिती साधारण गरिबीचीच होती. पण माझी पत्नी श्रीमंतींत वाढलेली होती. आमचा प्रीतिविवाह झाला असल्यानें पहिल्या पहिल्यानें आमचे दिवस फारच मजेंत गेले. या कालात आपल्या आवडीनिवडी बाजूला ठेऊन दुसऱ्याच्या आवडीनिवडी पुरविण्याकडेच माणसाचा साधारणतः कल असतो. आम्हालाही सुरवातीला तोच अनुभव आला. आणि म्हणूनच आमचे सुर-वातीचे दिवस अतिशय आनंदांत गेले. पण सत्य फार दिवस झांकून राहणें शक्य नसतें. मनुष्याचा खरा स्वभाव केव्हां ना केव्हां वर डोके काढतोच. माझ्या पत्नीचें हृदय प्रेमळ होतें यांत शंका नाहीं, पण श्रीमंतीचा दिमाख आणि स्वातंत्र्याची हांव हे तिचे दुर्गुण पुढें पुढें आमच्या सुखाच्या आड येऊं

लागलें. मी खूपसा पैसा मिळविण्याचा प्रयत्न करावा, श्रीमंत व्हावें आणि वैभवांत लोळावें ही तिची मनांतील इच्छा ! उलट, जेमतेम उदरनिर्वाहापुरता अर्थसंचय करता आला म्हणजे झालें; इतर वेळ ज्ञानार्जनांत घालवायचा, हा माझा स्वभाव ! आमच्या दोघांच्या स्वभावांतील या विरोधामुळें आमचे हळुहळु खटके उडूं लागले. तरीसुद्धा होतां होईल तो तिच्या इच्छेच्या आड यावयाचें नाहीं; शक्य तितक्या आणि शक्य तोंवर तिच्या चैनी पुरविण्याचा प्रयत्न करावयाचा असा क्रम मी ठेवला होता. पण समुद्राला बांध घालणें अगर आकाशाला ठिगळें लावणें या गोष्टी जशा अशक्य तशाच तिच्या वाढत्या गरजा पुरविणें मला माझ्या आटोक्याबाहेरचें वाटूं लागलें.

"माझ्याकडून मी तिला पूर्ण स्वातंत्र्य दिलें होतें. ती एकटी फिरावयास अगर नाटक सिनेमास गेल्यास मी तिला चकार शब्द बोलत नसे. हेतू हा कीं त्यायोगें तिच्या स्वातंत्र्य-लालसेला धक्का लागूं नये. पण दैव जणूं काय माझा पिच्छाच पुरवित होतें. यानंतर ती आपल्या पुरुष मित्राना घरीं आणूं लागली. आजच्या स्वातंत्र्याच्या कालांत या गोष्टीला अडथळा करणें शक्य झालें नसतें हे मी जाणून होतों. मग व्यर्थ तिचे तरी मन का दुखवा, असा विचार करून मी तिकडे काना-डोळाच केला. उलट कित्येक प्रसंगी ती करते तें मला आवडते असेंही मी तिला भासवूं लागलो, पण ह्या तिच्या स्वातंत्र्योपभोगाचा अतिरेक होत असल्याचें मला स्पष्ट दिसून येऊं लागलें.

" एक दिवस संधि साधून माझी मनोव्यथा शक्य तितक्या गोड भाषेंत मी तिच्या कानावर घातली. पण माझें कुठचेच बोलणें ऐकून घेण्याच्या मनःस्थितींत ती नव्हती. वैभवाच्या वाढत्या कैफानें ती इतकी धुंद झालेली होती कीं मी तिला कःपदार्थ वाटूं लागलों—आणि याचा परिणाम असा झाला की मी जों जों तिला समजाविण्याचा प्रयत्न करूं लागलों तों तों ती अधिकच चिडल्यासारखी करूं लागली.—आणि शेवटीं तर तिच्या संतापाचा पारा बराच वर चढला.

" तुमचा स्वभावच चमत्कारिक ! तुम्हांला कसलीच हौस नाहीं. ज्ञानार्जन, ज्ञानार्जन म्हणून भलत्याच खुळाच्या नादीं लागून समोर वाढून आलेल्या सौख्याचें ताट दूर लोटून देण्याची तुमची तयारी ! या अकालीं प्राप्त झालेल्या तुमच्या पोक्तपणाचा मला भारीच तिरस्कार वाटतो. आणि मी आज अगदीं स्पष्टच बोलतें कीं, या तुमच्या स्वभावामुळें मला तुमचाही अलीकडे तिरस्कार वाटूं लागला आहे."

" या तुझ्या दुर्दैवाबद्दल मला फार कीव वाटते. " मी शांतपणें म्हणालों.

" कींव ? " ती बेफामपणें बोलूं लागली. " कुणाकडूनही कींव करून घेण्याइतकी मी दुर्बळ खास नाहीं. 'दुर्दैव' या शब्दाचाहि मला तिटकारा वाटतो. सहजासहजीं सुखी होण्याचे हजारों मार्ग समोर दिसत असतांना दुर्दैव, दुर्दैव म्हणून छाती पिटून घेण्याइतकी कच्च्या मनाची मी नाहीं हें अनुभवानें तुमच्या प्रत्ययास आलें असेलच ! तशीच वेळ आल्यास तुमच्याशीं घटस्फोट करून मी माझ्या सुखाचा मार्ग मोकळा करून घेईन ! "

"—आणि तिनें ही आपली इच्छा लवकरच अंमलात आणली. मीही तिच्या घटस्फोटाला मान्यता दिली. याचा अर्थ माझें तिच्यावरील प्रेम कमी झालें होतें असें नाहीं, तर तिचें सुख हेंच माझें उद्दीष्ट होते आणि अमुक एका मार्गानें गेल्यानें आपण हमखास सुखी होऊं असें जर तिला वाटत असेल तर तिच्या सुखाच्या आड मी कशाला येऊं ? "

—" शारदाबाई, या गोष्टीला आज जवळ जवळ दहा वर्षें होत आलीं. तिनें पुढें कोणत्या आयुष्यक्रमाचा स्वीकार केला—तिने पुन्हा लग्न केलें किंवा नाहीं, याची मला कांहीच बातमी नाहीं. कदाचित् ती मला पूर्णपणें विसरूनही गेली असेल ! पण मी मात्र तिची मूर्ती माझ्या हृदयांत साठवून ठेवलेली आहे. तिचे दोष तेवढे डोळ्याआड करून तिच्या गुणाचीच मी आजवर जोपासना करीत आलो, मरणापूर्वी ती सुखात आहे एवढें जरी मला कळलें तरी मी आनंदानें मरेन ! "

श्रीधरकाकांना हें सर्व बोलण्याला बराच वेळ लागला. थांबत थांबत, क्वचित् अडखळत त्यांनीं आपलें बोलणे संपविलें. बोलण्याच्या श्रमांमुळें त्यांना बराच थकवा आला. त्यांनीं डोळे मिटून घेतले आणि ते स्तब्ध पडले.

" एकूण ती तुमची पत्नी तर ! " हे शारदाबाईच्या तोंडचे शब्द कानात पडतांच त्यांनीं दचकून आपले डोळे उघडले. त्यांच्या डोळ्यात आशेचा किरण चमकला.

" ती म्हणजे ? शारदाबाई, माझ्या पत्नीची व तुमची कधीं गाठ पडली होती का ? होय का शारदाबाई ? "

" होय ती मला भेटली होती !" शारदाबाईचा आवाज जड झाला होता.

" अगदीं अलिकडेच ती मला भेटली होती. तिनें मला आपली सर्व हकिकत निवेदनही केली. तिच्या काहीं रंगेल मित्रांनीं भावी आयुष्याचा मनोहर चित्रपट तिच्यासमोर उभा केल्यामुळेच ती तुमच्याशीं घटस्फोट करण्यास उद्युक्त झाली.—तिनें अशाच एका रंगेल तरुण मित्राशीं विवाह केला.—आणि आपण रंगविलेले आयुष्यचित्र किती भ्रामक होतें हें तिला लवकरच कळून आलें. तिच्या पैशावर त्या रंगेल तरुणानें मनसोक्त चैन मारली पण चैनींत त्याची सुखोपभोगाची लालसाच तेवढी तिला दिसून त्याचें अंतःकरण ती काबीज करूं शकली नाहीं. त्या अंतःकरणात आपल्या विषयींच्या प्रेमापेक्षां आपल्या संपत्तीचें प्रेमच ठाण माडून बसलेलें तिला आढळून आलें.—त्या निष्प्राण चैनीत तिचे मन रमेनासे झालें. तिला चैन हवी होती. पण चैनीच्या पायी इतर कोमल मनोविकाराची होळी झालेली तिला नको होती.—तिची संपत्ती हळुहळू संपुष्टात आली आणि त्याचे तिच्यावरील मन पूर्णपणे उडाले. तिला पश्चाताप झाला. तुमच्या प्रेमळ स्वभावाशी जेव्हा ती त्या तरुणाच्या स्वभावाची तुलना करूं लागली तेव्हा तिचे डोळे खाडकन् उघडले.—पण आता काय उपयोग? तिने आतां त्या तरुणाशीहि घटस्फोट करून घेतला आहे.—विरक्तपणे ती अशीच कुठें तरी भटकत असते. तिच्या एकदर मनःस्थितीवरून ती तुम्हाला भेटण्यास अत्यंत आतुर झालेली आहे असे दिसतें! तिला तुमची क्षमा मागावयाची आहे!"

श्रीधरकाकाचे डोळे भरून आले होते.

" शारदाबाई, ती तुम्हाला पुन्हा कधीं भेटेल का? भेटल्यास तिला सांगा की मी तिला पूर्णपणे क्षमा केली आहे. एवढेच नव्हे तर मरतानादेखील माझें तिच्यावरील प्रेम तिळमात्रही कमी झालेलें नाहीं!"

त्याच्या हातावर एक दोन कढत अश्रुबिंदु पडल्याचा त्याना भास झाला. त्यानीं शारदाबाईकडे पाहिलें. तिच्या नेत्रातून अश्रूंचा अविरत प्रवाह सुरू झाला होता.

"—मला क्षमा केलीत!—आतां मी सुखी झालें!" शारदाबाई म्हणत होती. " मीच ती आपली एका काळची अभागी पत्नी! कुणालाही सहजासहजीं ओळखूं न येईल इतका आता माझ्यांत फरक पडला आहे!—पण आपण मात्र मला सहज ओळखूं शकाल?—ओळखलंत का मला?"

" होय ! ओळखली !–माझी पत्नी ! माझी सरोज !–पण माझी पत्नी म्हणयाचा आतां मला अधिकार नाहीं !" त्यांनीं आपले डोळे घट्ट मिटून घेतले.

"—आणि तो अधिकार आपल्याला प्राप्त व्हावा हीच आता माझ्या आयुष्यांतील एकमेव इच्छा आहे. !–आतांच मला आपण क्षमा केलीत ना ?"

" सरोज ! मृत्युशय्येवर पडलेल्या माणसाची पत्नी होण्यात तूं कसलें सुख साधणार ? "

" मी तुमची विधवा म्हणवून घेण्याचें !–माझी सुखाची कल्पना आतां पार बदलून गेली आहे. माझ्या या अभागी हाताचा स्वीकार कराल तर जन्मभर आपल्या नावानें वैधव्य स्वीकारण्यांत मला फार समाधान वाटेल ! माझ्या या इच्छेचा अव्हेर करूं नका ! "

तिनें आपला नाजूक हात कापत कांपत पुढे केला !

श्रीधरकाकांनीं आपल्या अशक्त हातांत तो घेऊन आपल्या छातीवर ठेवला

" सरोज ! आता जें मला मरण येईल तें किती भाग्याचें ? " ते म्हणाले.

